PUBLISHED FOR THE EDUCATIONAL DEPARTMENT.

# ÆSOP'S FABLES,

SELECTED FROM THE THIRD EDITION OF THE

MARATHI TRANSLATION

OF

SADÁSHIVA KÁSHINÁTH CHHATRE.

REVISED AND ENLARGED BY

MAJOR T. CANDY.

SECOND EDITION.



BOMBAY.

PRINTED AT THE BOMBAY SUMMACHAR PRESS

1861.

Price Five Annas.

# इसापनीतिकथा.

हा ग्रंथ सदाशिव काशीनाथ छत्रे यांणी इंग्रेजी
वरून मराठी भाषेंत केला;

## तो मेजर क्यांडी साहेब यांणी तपासला,

त्याच्या तिसऱ्या आवृत्तीच्या बुकांतून कांहीं गोष्टी निवडून घेऊन

हें लहान पुस्तक

मेहेरबान दैरेक्तर आफ् पब्लिक इन्स्त्रक्शन्

यांच्या हुकुमावरून केलें.

आवृत्ति दुसरी.

मुंबई.

मुंबई समाचार छापखान्यांत छापिलें.

इसवी सन १८६१. शके १७८३.

किंमत ५ आणे.

# सूचना.

पूर्वी इसापनीति कथा या नावाचें पुस्तक सदाशिव काशीनाथ छत्रे यांनीं इंग्रेजी बुकावरून मराठी भाषेंत केलें तें प्रसिद्ध आहे. त्याच्या अनेक आवृत्ति छापल्या गेल्या; परंतु तें पुस्तक कांहीं मोठें व अधिक किंमतीचें यामुळें मेहेरबान डैरेक्तर आफ् पब्लिक् इन्स्त्रक्शन् यांच्या हुकुमावरून पहिल्या पुस्तकांतल्या सुमारें ९९ गोष्टी चांगल्या चांगल्या निवडून घेऊन त्याचें हें लहानसें पुस्तक थोडक्या किंमतीनें मिळावयाजोगें केलें आहे.

ज्यानें मुळीं या गोष्टी रचल्या तो इसाप इसवी सनाच्या पूर्वी सुमारें साहाशें वर्षें एशिया प्रांतीं जन्मला होता. तो जरी हलक्या कुळांतला असून दुसऱ्याच्या घरीं गुलाम होऊन राहिला होता, तरी तो आपल्या शहाणपणानें गुलामपणापासून मुक्त होऊन मोठी मान्य पदवी पावला होता. तो मोठा बुद्धिवान्, चतुर, शहाणा, व विद्वान् होता. त्यानें मंदमति लोकांस चांगला उपदेश व्हावा या हेतूनें नीतिपर पुष्कळ गोष्टी रचल्या, त्या सर्वत्र प्रसिद्ध आहेत.

त्यानें पशुपक्षी यांच्या गोष्टी कल्पून रचल्या याचें कारण असें दिसतें, कीं लोकांस आपण साक्षात् मुखानें उपदेश करावा त्यापेक्षां उदाहरणें दाखवून अन्योक्तीनें उपदेश करावा हें फार उपयोगाचें असें त्याला वाटलें असावें.

इसापानें रचलेल्या नीतीच्या कथा म्हणून इसापनीतिकथा असें पुस्तकास नांव दिलें आहे. या पुस्तकांत कथा थोड्या घेतल्या आहेत. याहून राहिलेल्या कथा पहाव्या अशी ज्यास इच्छा असेल त्यानें मोठें पुस्तक पहावें.

# अनुक्रमणिका.

## आनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

## गोष्ट १.

### अरण्य आणि लांकूड तोड्या.

एक लांकूड तोड्या एके दिवशीं रानांत असतां आसपास पाहून दुःख करूंलागला. तेव्हां झाडांनीं त्यास पुसलें, तुलाकाय पाहिजे? त्यानें उत्तरकेलें, माझ्या कुऱ्हाडीस दांडा नाहीं, त्याकरि तां लहानसा एक लांकडाचा तुकडा मिळता तर बरें होतें. त्या काळीं सर्व झाडांनीं मिळून विचार केला; आणि त्यामनुष्यास चांगला, चिवट, चिंचेच्या लांकडाचा एक तुकडादिला. लांकूडतोड्यानें तो कुऱ्हाडीस घालून लहान मोठीं झाडें सरोबरीनें तोडिलीं. तेव्हां सायाचा वृक्ष इतर वृक्षांस बोलिला, गड्यांनो, आपण आपल्या हातीं आपला अनर्थ करून घेतला, एथें दुसऱ्यास शब्द नाहीं.

### तात्पर्य.

शत्रूची दया करून अविचारानें जो त्यास साहित्य करितो, तो शेवटीं पश्चात्ताप पावतो. शत्रूवर उपकार करावा, त्याचे अन्यायांची क्षमा करावी, यांत थोरपणा आहे; परंतु जेणेंकरून तो बलवान् होऊन उलटा आपणास उपद्रव करूं शकेल, तें केल्यास आपला मूर्खपणा आहे.

---

## गोष्ट २.

### आस्वल आणि मधमाशा.

एके वेळेस असें झालें कीं, एक मधमाशी आस्वलाच्या नाकास डसली. तिचा सूड घ्यावा ह्मणून आस्वलानें मधमाशांच्या पोळीस

थापट मारून पाडलें. तेव्हां त्या पोळीवरील सर्व माशांस राग आला, आणि त्यांचा झांकांचा झांका येऊन आस्वलावर पडला; आणि त्यांनीं त्यास नखशिखांत दंश करून करून इतकें घाबरें केलें कीं, आतां प्राण जावा अशी त्याची अवस्था झाली मग माशा उडून गेल्यावर तो आपल्या आंगास चाटून विचार कारतो, रे म्यां काय मूर्खपणा केला हा ! जर म्यां त्या एका माशीचा दंश सोसून घेतला असता तर हा एवढा अनर्थ मजवर कां आला असता ? पण, एकाचा सूड उगविण्याकरितां म्यां सर्वांचा द्वेष आपणावर आणला, तर यांत माझी काय दशा झाली पहा.

### तात्पर्य.

एकाच्या अपराधाचा सूड उगविण्याकरितां साऱ्या मंडळीचा द्वेष संपादावा, त्यापेक्षां तो तेवढाच सोसून राहावें, यांतच हित व शहाणपण.

---

## गोष्ट ३.

### आंधळा माणूस आणि लंगडा माणूस.

एक आंधळा माणूस वाट चालत असतां, त्यास एकेजागीं बिकट वाट लागली; तेथें एका लंगड्या माणसाची गांठ पडली; त्यास तो ह्मणतो, बाबारे, मला या बिकट वाटेंतून पार ने. लंगडा त्यास उत्तर करतो, गड्या, हें माझ्यानें कसें होईल ? मीच मोठ्या संकटानें चालतों; मग दुसऱ्यास माझ्यानें पार कसें करवेल ? एकमात्र उपाय दिसतो, तो असा; तुझे हातपाय चांगले खबरदार आहेत, तर तूं मला खांद्यावर घेऊन चाल, ह्मणजे मी तुला वाट

सांगेन; ह्याप्रमाणें केल्यानें माझे डोळे तुझ्या कामास पडतील; आणि तुझे पाय माझ्या कामास पडतील; अशा युक्तीनें आपण दोघे सुरक्षित पार जाऊं, आंधळा उत्तर करितो, गड्या, फार चांगली गोष्ट सांगितली; आपण एकमेकांच्या कामीं पडूं असेंच करूं. असें बोलून आंधळा लंगड्यास खांद्यावर घेऊन चालला; आणि एकमेकाच्या सहाय्यानें अवघड वाटेंतून दोघे पार पडले.

### तात्पर्य.

एकट्या मनुष्यास सर्व कामें होत नाहींत, सर्वांस सर्वांची गरज लागत्ये. जशी आपणास गरज लागत्ये, तशीच दुसऱ्यांसही लागत्ये, हें मनांत आणून परस्परांनीं परस्परांचें सहाय्य करावें.

---

## गोष्ट ४.

## उंदरांची सभा.

एकेसमयीं उंदीर आपली मंडळी मिळवून विचार करूं लागले कीं, मांजरापासून आपले प्राण राखावयाविषयीं सबळ अशी युक्ति कोणती ! तेथें बहुत कल्पना निघल्या; आणि पुष्कळ भवति नभवति झाली. त्यासमयीं एका तरण्या उंदरानें पुढें होऊन मोठें पांडित्य करून शेवटीं सिद्ध केलें कीं, त्यास एकचयुक्ति; ती अशी कीं, मांजराच्या गळ्यांत घांट बांधावी, ह्मणजे ती अमळ हालली कीं, सावध होऊन आपणास आपआपल्या बिळांत जातां येईल. तें ऐकून सर्वांनीं, वाहवा ! चांगली युक्ति ! असें ह्मणून मान डोलविली; आणि त्यांतून कितीएक ह्मणूं लागले कीं, ह्या उंदरास सर्वांपासून एक मान पत्र असावें. तेथें एक ह्महाणा ह्मा-

तारा उंदीर होता, तो तें सर्व ऐकून घेऊन उभा राहिला, आणि ह्मणतो, गड्यांनो, कल्पना तर बहुत सुंदर आहे आणि तिचा काढणाराही अत्यंत कुशळ आहे खरा, यांत संशय नाहीं, परंतु त्याच्या मुखानें मला अजून इतकें समजलें पाहिजे कीं, मांजराच्या गळ्यांत ती घांट कशी बांधावी, आणि कोणता उंदीर तें काम पत्करितो. हें कळेपर्यंत आपण यास मानपत्र देऊंनये. तें ऐकून सर्वांनीं त्या तरण्या उंदराचा उपहास-केला.

## तात्पर्य.

तोंडच्या योजनेंत पुष्कळ गोष्टी सोप्या दिसतात; परंतु करूं लागलें असतां समजतें कीं, कठिण आहेत, यासाठीं जो पुरुष एकादी युक्ति सांगावयास पुढें होतो, ती कशी करतां येईल, हें त्यानें प्रत्ययास आणून दिल्या वांचून त्यास नावाजूं नये.

---

## गोष्ट ५.

## कस्तूरिका मृग.

कोणा एका जातीचा हरिण आहे, त्याच्या बेंबींत कस्तूरी सांपडत्ये; ह्मणून तो दृष्टीस पडला असतां पाठलाग करून लोक त्याचा प्राण घेतात. एकेसमयीं असा एक हरिण पळतो आहे, आणि त्यामागें कुतरीं व पारधी लागले आहेत, अशासमयीं हरिणास प्राणसंकट पडलें, आणि निभावणीची वाट सांपडेना. इतक्यांत त्यास विचार सुचला कीं, हे घातकी कस्तूरीकरितां मला मारावयास इच्छितात, दुसरें कांहीं कारण नाहीं; त्यास तितकी टाकून दिली तर सुखी होईन. मग त्यानें धैर्य करून तसें केलें, तेव्हां तो संकटांतून मोकळा झाला.

### तात्पर्य.

एकाच्या पाठीस दुसरा कोणी लागतो, त्यास बहुत करून लोभावांचून दुसरें कारण नसतें; ह्मणून जेव्हां असा प्रसंग पडतो, आणि दुसरा कांहीं उपाय चालत नाहीं, तेव्हां असें करावें कीं, ज्या वस्तूच्या लोभानें दुष्ट आपणास छळितात, ती टाकून द्यावी, आणि शोभा राखून आपला बचाव होईल तर करावा. शोभा राहून जरी सर्वस्वाची हानि झाली, तरी ती हानि असें मानूं नये.

---

## गोष्ट ६.

### कांसव आणि गरुड पक्षी.

एक कांसव भुईवर चालतां चालतां कंटाळलें. त्यास असें वाटलें कीं, आकाशांतून सृष्टीचा चमत्कार कसा दिसतो तो पाहावा, त्यानें पक्ष्यांस सांगितलें कीं, जो कोणी मला आकाशपंथानें फिरवील, आणि सृष्टीचें कौतुक दाखवील, त्यास पृथ्वीच्या पोटांतील रत्नांच्या खाणी ज्या मला ठाऊक आहेत त्या मी दाखवीन. गरुड पक्ष्यानें तें मान्य करून कांसवास आकाशांतून पृथ्वीवरील सर्व चमत्कार दाखविले. मग त्यास ह्मणाला कीं, आतां तुझ्या रत्नांच्या खाणी कोठें आहेत ! त्या तूं मला दाखीव. ह्यासमयीं कांसव गांगरून वेड्याचें सोंग घेऊं लागलें; तें पाहून गरुडास क्रोध आला, आणि त्याणें त्याच्या नाजूक ठिकाणीं आपलीं नखें रोंवून त्यास तात्काळ मारून टाकिलें.

### तात्पर्य.

प्रतिज्ञेप्रमाणें केलें नाहीं तर त्यांत हानि आहे. थोर आहे

त्याची प्रतिष्ठा जात्ये. साधारणास प्रतिष्ठा जाऊन दुखापत होत्ये. आणि जो केवळ लबाड; दुसऱ्यास ठकवावयास पाहातो, त्याचें तर सर्वस्व जाऊन समयीं प्राणासही धक्का बसतो.

---

## गोष्ट ७.

## कांसवी आणि दोन हंस.

कोणीएक कांसवीण फार दिवस एके ठिकाणीं राहून कंटाळली होती. ह्मणून देशांतरीं जावें अशी इच्छा तिनें धरिली. तिचे मित्र दोन हंस होते, त्यांस तिनें आपली इच्छा सांगितली; तेव्हां ते ह्मणाले, बरें आहे; तुझी इच्छा आह्मी सिद्धीस नेऊं, तूं एके काठीस मध्यभागीं तोंडानें धर, आह्मी त्या काठीचीं दोन शेवटें दोहोंकडून दोघे धरूं, आणि आकाशमार्गानें दूरदेशास तुला घेऊन जाऊं. ती युक्ति कांसविणीच्या मनास येऊन तिनें एका काठीस तोंडानें धरिलें; मग दोघां हंसांनीं काठीचीं दोन शेवटें धरून, तिला उचलून, आकाशांतून उडत चालले, इतक्यांत वाटेनें एक कावळा भेटला; तो त्यांस विचारतो, अहो, तुह्मी कोणास घेऊन चाललां ? हंस बोलले, आह्मी कांसवाचे राणीस घेऊन चाललों. हें हंसांचें बोलणें ऐकून कांसविणीस मोठा आनंद झाला; आणि हंसांनीं जो आपणास थोरपणा दिला तो खरा करावा, ह्मणून ती हे शब्द बोलली, होय, मी कांसवाची राणी आहे. असें बोलावयास तोंड उघडलें, तोंच ती काठीपासून सुटून, खालीं एके दगडावर आपटून प्राणास मुकली.

### तात्पर्य.

नानाप्रकारचे देश आणि नानाप्रकारचे लोक, व तेथील नि-

रानिराळ्या रीतिभाती पाहून आपलें ज्ञान वाढविणें, व एकाच देशांत राहून जो स्वाभिमान होतो तो घालविणें, हें योग्यच आहे; परंतु आपल्या स्थितीस कंटाळून, उगीच निरर्थक जो दूर देशचा प्रवास तो, आणि गुण नसतां ओढून आणलेली शेखी, हीं दोन्हीं नाशास कारणें होतात.

---

## गोष्ट ८.

## किरडूं आणि कानस.

एक किरडूं लोहाराच्या दुकानांत जाऊन कांहीं खावयाच्या पदार्थाकरितां खालीं वर टेहळीत होतें, तों त्यानें एक कानस पाहिली. ती चावावयास लागलें, त्यासमयीं कानस त्यास धिक्कारून बोलली, रे मूर्खा, तूं माझ्या वाटेस जाऊं नको. जी मी लोखंड आणि तिखें यांसही चावणार, त्या मला चावून तुझे दांत मात्र पडतील.

### तात्पर्य.

शत्रूचें सामर्थ्य पाहून त्यास उपद्रव करावयाचा तो करावा. ज्यास सर्व लोक मानितात, आणि ज्याचें ह्मटलेलें करितात, त्याशीं विरोध केला असतां आपल्याच नाशास कारण होईल; तशीच शहाणपणाच्या बळानें थोरांची निंदा केली असतां आपलें मूर्खत्व मात्र दिसेल.

---

## गोष्ट ९.

## कुतरा आणि त्याचें प्रतिबिंब.

एक कुतरा तोंडीं भाकरीचा तुकडा धरून नदी उतरून

पलीकडे जात होता. त्यानें आपली पडछाया पाण्यांत पाहिली; तेव्हां त्यास वाटलें कीं, हा कोणी दुसरा कुतरा भाकरी तोंडांत घेऊन जात आहे; ती आपण त्या जवळून हिरून घ्यावी. असा विचार करून तोंड उघडुन लोभानें ती धरावयास गेला; तों तोंडांतील भाकरी पाण्यांत पडून तळीं गेली; ती पुन्हा त्यासि सांपडली नाहीं.

### तात्पर्य.

लोभ हा दुर्गुण सर्वांनीं सोडावा. देवानें जें दिलें, त्यामध्यें संतोष न मानून, जो पुरुष दुसऱ्याचें घ्यावयास पाहतो, त्यास तें न मिळून जवळ असतें तेंही जातें.

---

## गोष्ट १०.

### कुतरा आणि मगर.

मिसर देशांतील नील नदीच्या तीरानें एक कुतरा चालला होता. त्यास जातां जातां ताहान लागली. परंतु नदींतील मगरांच्या भयामुळें स्वस्छपणें उभें राहून पाणी प्यावयास त्यास धैर्य होईना; ह्मणून त्यानें पळतां पळतां कांहीं पाणी चाटून घेतलें. इतक्यांत नदींतील एक मगर पाण्यावर डोकें काढून त्यास ह्मणतो, रे गड्या, तुला इतकी उतावळी कां झाली आहे? फार दिवसांपासून तुझी मैत्री जोडण्याची इच्छा आह्मास आहे; तर हा प्रसंग चांगला आहे, उभा घडीभर; आपण सुखदुःखाच्या गोष्टी बोलूं. कुतरा त्यास उत्तर करितो, मगर दादा, माझी मैत्री करावयास तुह्मी इच्छितां; हा मजवर मोठा उपकार झाला; पण खरें सांगतों रे तुमच्या सारख्यांची मैत्री चुकवावी ह्मणूनच मी पळत आहें.

### तात्पर्य.

जे दुर्गुणी आहेत त्यांच्या संगतीनें भल्यांचा नाश होतो, ह्मणून भल्यांनीं त्यांच्या वाऱ्यास देखील उभें राहूं नये.

---

## गोष्ट ११.

### कुळंबी आणि त्याचे लेंक.

कोणी एक कुळंबी मरावयास टेंकला होता; त्याच्या मनांत होतें कीं, आपण आजपर्यंत धंदा चालविला आहे, तसाच आपल्या मागें सदोदित आपल्या मुलांनीं चालवावा. तेव्हां त्यानें ही युक्ति केली, अवघ्या मुलांस खाटेजवळ बोलावून सांगितलें, मुलानो, माझें काय जें आहे, तें हीं शेतें आणि वाड्या आहेत; यांचे धनी तुह्मी सर्व मिळून आहांच. वरकड काय जो माझा कुणगा असेल, तो कोठेंतरी या शेतांमध्यें हातभर भुईखालीं पुरलेला आहे; ह्मणून तीं शेतें तुह्मी दुसरे कोणाचे हातीं लागूं देऊं नका बरें! तें ऐकून पुत्रांनीं निश्चय केला कीं, ह्मातार्‍यानें कांहीं द्रव्य शेतामध्यें पुरून ठेविलें आहे. मग तो कुळंबी वारल्यानंतर त्यांनीं तीं शेतें लागवडीच्या निमित्तानें, हातभर खणून पाहिलीं; त्यांत त्यांस ठेवातर सांपडला नाहीं; परंतु भुई चांगली खणिली, त्यामुळें त्या शेतांत लावलेला दाणा दशगुणित आला; आणि त्यांस बहुत द्रव्याचा लाभ झाला. मुलांपैकीं एक शहाणा होता तो ह्मणाला, शेतांमध्यें कुणगा आहे असें बापानें सांगितलें होतें तो हाच असावा.

### तात्पर्य.

आंगची कुशळता आणि उद्योग जेथें आहेत तेथें द्रव्य लाभ

अवश्य आहेच. उद्योगांत कृषिकर्मासारिखा दुसरा उद्योगच नाहीं; तो, जे स्वयें करितात त्यांस परिश्रम होतो, त्यामुळें एकतर आरोग्यलाभ; दुसरें या संसारांत निर्वाहास ज्या वस्तु पाहिजेत त्यांचा तोटा पडत नाहीं. ह्यासाठीं शेतें अथवा वाड्या सुज्ञांनीं मोठ्या आवडीनें कराव्या. त्यांत केला जो श्रम तो निश्चयेंकरून व्यर्थ जात नाहीं. ज्याच्या लाभास धोका नाहीं, असा हा एकच धंदा आहे; याच्या करणाऱ्यास चोर सर्वस्वी नागवूं शकत नाहीं.

## गोष्ट १२.

## कुळंबी आणि शाहमृग.

एका कुळंब्यानें शेत पेरिलें होतें, त्यास हंस व बगळे ह्यांचा उपद्रव फार झाला; तेव्हां त्यानें शेतांत जाळें मांडून पुष्कळ हंस व बगळे धरिले; त्यां बरोबर एक शहामृग सहज आला होता तोही सांपडला. तेव्हां तो शहामृग कुळंब्याची प्रार्थना करून ह्मणतो, दादारे, मला मारूं नको! पाहा, मी हंस नव्हें, बगळाही नव्हें, दीन शहामृग आहें, आह्मी स्वधर्मानें वागत असतों; आईबापांस ह्यातारपणीं आपल्या पाठीवर वाहून पोशितों. त्यास कुळंबी ह्मणतो, रे, तें सर्व खरें असेल, परंतु ह्या वेळेस तूं मला वाईटांच्या संगतींत आढळला आहेस, ह्मणून तुलाही त्यांच्या बरोबरीनें पारिपत्य केलें पाहिजे.

### तात्पर्य.

दुर्जनांच्या संगतीनें सज्जन अप्रतिष्ठा पावतो, आणि ज्या संकटांत ते पडतात त्यांत तोही पडतो.

## गोष्ट १३.

## कृपण मनुष्य.

कोणा एका कृपणानें पैसा सांचवून आपल्या शेतांत पुरून ठेविला. तेथें नित्य एक दोन वेळ त्यानें जात असावें; आणि पैसा पुरलेलें ठिकाण पाहून मनांत संतोष पावत असावें. तें त्याचे कृत्य त्याच्या चाकरानें लक्षांत आणून त्यावर तर्क बांधिला कीं, माझा धनी या जागेकडे नित्य नित्य पाहातो; तस्मात् एथें कांहीं विशेष असेल. मग त्यानें रात्रीस येऊन जागा खणून पाहिली, तों आंत ठेवा सांपडला; तो घेऊन तो पळून गेला. दुसऱ्या दिवशीं कृपण नित्याप्रमाणें तेथें येऊन पाहूं लागला, तों ठेवा गेला, हें समजून त्यानें डोईत धूळ घातली; तो ऊर बडवूं लागला; आणि हाय हाय करून रडत बसला; तो घरी जाईना. शेवटीं त्याचा शेजारी त्यापाशीं तेथें गेला; त्यानें वर्तमान पुसलें; त्यास कृपणानें सर्व सांगितलें तें ऐकून शेजारी ह्मणतो, रे, बाबा, मला असें वाटतें कीं, तुझें कांहीं गेलें नाहीं; तूं आपल्या चित्तांत पैसा गेला असें न आणितां, ह्या खाचेकडे नित्य पाहात होतास तसाच पाहात जा, ह्मणजे तुझें काम झालें.

### तात्पर्य.

कृपण आहेत ते पैसा असून दरिद्री. ते जवळच्या द्रव्याचा उपभोग न करून अधिक मिळवावयाच्या लालचीनें मरेपर्यंत दुःख भोगून अनेक प्रकारचीं पातकें निरंतर करीत असतात. शेवटीं त्यांचा पैका चोर पोर खाऊन जातात. त्यांच्या वांट्यास दुःख, शोक, आणि मेल्यानंतर अक्षय नरक, इतकें मात्र येतें.

## गोष्ट १४.

## कोंबडी आणि कोल्हा.

एक कोल्हा एका खोपटींत शिरून कांहीं भक्षावयास मिळावें ह्मणून खालींवर पाहात होता. त्यानें तेथें एक कोंबडी पाहिली; ती माळ्यावर उंच बसली होती, तिजपाशीं त्यास जाववेना; तेव्हां तो तिची प्रशंसा करून ह्मणतो, ताई तुझा कायगे समाचार आहे? तुला फार बरें वाटत नाहीं, घरांतच निजून असत्येस, मी ऐकिलें, तेव्हांपासून, ताई, मी तुला खरेंच सांगतों, मला असें दुःख झालें आहे कीं, रात्रंदिवस झोंप लागत नाहीं. तर गडे, खरेंच सांग मला, तूं आतां कशीगे आहेस? खालती तरीये, मला तुझी नाडी पाहूंदे, असा तो बोलतो आहे, मध्यें मध्यें तिला नावाजतो आहे; कोंबडी त्या बसल्या जाग्यावरूनच उत्तर करिये, खरेंचरे, भाऊ, त्वां ऐकिलें तें खरेंच. असें दुखणें मला कधींही आलें नव्हतें. मी आतां खालीं तुजकडे आलें असत्यें, पण वैद्यानें मला सांगितलें आहे कीं, तूं कोणास जवळ येऊं देऊं नको आणि कोणाजवळ जाऊं नको; ह्मणून, रे, भाऊ मला खालीं येववत नाहीं. आतां तूं ह्या वेळेस जा. सध्या मी अशक्त इतकी आहें कीं, तुझ्याजवळ चालून आलें असतां माझा प्राण निघून जाईल.

### तात्पर्य.

खुशामती मात्र जितका, तितका लबाड. तो सर्वांचा शत्रु, असें समजून सर्वांनीं त्याशीं तशीच वर्तणूक करावी. कांतर त्याच्या मायावी भाषणाच्या पार दृष्टि पोहोंचवून त्याच्या पाशांत सांपडणार नाहींत असे चतुर पुरूष ह्या लोकांत थोडेच; फसणारे असे फार.

## गोष्ट १५.

### कोल्हा आणि कांटे झाड.

एके कोल्ह्याचे मार्गे पारध्याचे कुतरे लागले असतां तो एके झांपाळलेल्या कांटे झाडाच्या खालीं जाऊन लिकाला; आणि आपणास चांगला आश्रय मिळाला, हें पाहून तो समाधान पावला. मग कांहीं वेळानें हालूं चालूं लागला, तेव्हां चोहींकडून आंगास कांटे टोंचूं लागले, त्यावेळीं त्यानें मनांत विचार केला कीं, या जगांत केवळ सुख किंवा केवळ दुःख असें कोठें नाहीं; दोन्ही मिश्रित आहेत. सुखांत दुःख असतें आणि दुःखांत सुख असतें. हे कांटे मला टोंचतात, यामुळें दुःख होतें खरें तरी हे माझा प्राण वांचवितात, हें सुख आहे; ह्मणून यांविषयीं आपण कुरकूर करूंनये.

### तात्पर्य.

एकाद्या मोठ्या लाभाच्या अनुषंगानें लहानसें दुःख होत असलें, तर त्या मोठ्या लाभावर दृष्टि देऊन तें अल्प दुःख निमूटपणें सोसावें, हेंच योग्य.

---

## गोष्ट १६.

### कोल्हा आणि कोंबडा.

एके दिवशीं प्रातःकाळीं एक कोल्हा एका वाड्यावर दोरीच्या फांसांत सांपडला. तें दुरून पाहून एक कोंबडा हळूच त्याजवळ येऊन त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. त्यास कोल्हा ह्मणतो, भाऊ, पाहिलेंना, मी काय संकटांत पडलों तें! आणि हें सर्व, बारे तुजकरितां; कांकीं मी घरीं जात होतों इतक्यांत तुझा शब्द का-

नीं आला, आणि मला असें झालें कीं, तुला केव्हां पाहीन, म्हणून घाईनें येत होतों तों असें झालें. आतां तूं असें कर कीं, एक सुरी आण आणि ही दोरी काप. तें तुझ्यानें न होई तर हें माझें वर्तमान तरी कोणाकडे सांगूं नको; जंव मीच ही दोरी आपल्या दांतांनीं कुरतुडून टाकून सुटून जाईन. कोंबड्यानें तें कृत्रिम समजून त्यास कांहीं उत्तर दिलें नाहीं, आणि लवकर जाऊन पहिल्यानें वाडेकरास तें वर्तमान सांगितलें. तो धांवत आला, आणि कोल्हा दोरी कुरतुडतो आहे, तों त्यानें त्याचें पारिपत्य केलें.

### तात्पर्य.

दुष्टावर उपकार करूं नये. म्हणाल कीं, कोणाच्याही संकटीं कामास पडावें, अशी नीति आहे, तीवरून चोरासही सहाय्य व्हावें, असें होतें; तर असें नाहीं; दुष्टांस मदत दुष्टांनींच, आणि चोरांस चोरांनींच करावी. इतरांस काम नाहीं.

---

## गोष्ट १७.

## कोल्हा आणि गांवढेकर.

एका कोल्ह्यामागें पारध्यानीं फार लगट केली, म्हणून तो धांवतां धांवतां थकला. तेव्हां वाटेवर गांवढेकर उभा होता, असें पाहून त्यानें त्याची प्रार्थना केली कीं, मला तुझ्या खोपटांत लपूं दे. गांवढेकर म्हणाला, बरें; मग कोल्हा त्याच्या खोपटाच्या कोनांत दडून राहिला असतां पारधी मागून आले, त्यांनीं गांवढेकर ह्यास विचारिलें, एकादा कोल्हा जातां पाहिला? गांवढेकर बोलला, पाहिला नाहीं. असें तोंडानें बोलेमात्र; परंतु कोल्हा लपला होता तें ठिकाण बोटानें त्यांस वरचेवर दाखवी. ती त्याची खूण न सम-

जतो तें पारधी निघून गेले. नंतर कोल्हा हळूच तेथून निघून जावयास लागला; त्यासमयीं गांवढेकर त्यास ह्मणतो, अरे, हीच तुझी रीत काय? ज्यानें तुझे प्राण वांचविले त्यास त्वां जातेसमयीं पुसलें देखील नाहीं. कोल्ह्यानें त्याचें कृत्य फटींतून पाहिलें होतें, तें मनांत धरून तो उत्तर करितो. गड्या, तुझ्या बोलण्याप्रमाणें तुझें करणें जर असतें, तर तुझा उपकार फेडावयास चुकलों नसतों.

### तात्पर्य.

कित्येक अधम असे आहेत कीं, बाहेरून बोलण्यांत मोठा आप्तपणा दाखवितात; आणि आंतून नाश करावयाचा उद्योग करीत असतात. उघड वैरी असतो तो बरा परंतु मित्राच्या सोंगानें आंतून शत्रूचें कर्म आचरितो तो फार वाईट, हित शत्रु, विश्वास घातकी, फार नीच; त्याचें तोंड पाहूंनये.

---

## गोष्ट १८.

### कोल्हा आणि द्राक्षें.

एक भुकेनें पीडित असा कोल्हा फिरत फिरत द्राक्षीच्या मांडवाखालीं आला, वरती पाहतो तों सुंदर पिकलेले द्राक्षांचे घोंस लोंबत आहेत; परंतु मांडव उंच यामुळें तीं हातीं लागतना, ह्मणून उड्या मारून मारून थकला; एकही द्राक्ष प्राप्त झालें नाहीं. शेवटीं अंमळ दूर जाऊन, द्राक्षांकडे पाहून ह्मणतो, हीं द्राक्षें जो घेईल तो घेवो मी तर हिरवीं आंबट ह्मणून सोडून जातों.

### तात्पर्य.

कित्येक पुरुष असे असतात कीं, त्यांच्या हातीं जी वस्तु ला-

गत नाहीं तीस कांहीं खोड ठेऊन आपला हलकेपणा झांकतात.

## गोष्ट १९.

### कोल्हा आणि बकरा.

एक कोल्हा पाणी प्यावयाकरितां एका विहिरीवर गेला, तो आंत पडला. त्यानें बाहेर निघायास फारवेळ यत्न केला; परंतु कांहीं सोय सांपडेना. इतक्यांत एक बकरा तेथें आला, त्यानें त्यास पुसलें, अरे, हें पाणी चांगलें आहे? कोल्हा उत्तर करितो. गड्या, चांगलें ह्मणून काय सांगूं ! हें अमृतासारिखें गोड आहे; पितां पितां माझी इच्छा तृप्तच होत नाहीं, आणि एथून जावें असें वाटत नाहीं. तें ऐकून बोकडानें आंत उडी टाकिली. त्याचीं शिंगें मोठीं होतीं, त्यांजवर कोल्ह्यानें तत्क्षणीं पाय ठेविले, आणि तो उडी मारून विहिरीबाहेर निघून गेला. मग बोकड गचकळ्या खातां खातां मृत्यु पावला.

### तात्पर्य.

लोक जें जें करितात त्यांत त्यांत आपआपला स्वार्थ पाहातअसतात. दुसऱ्याच्या हितासाठीं उद्योग करणारे असे पुरुष थोडेच; ह्मणून जो कोणी कांहीं लाभ दाखवील, त्या मनुष्याची सचवटी, मुळीं पक्केपणीं समजल्यावांचून त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नये.

## गोष्ट २०.

### कोल्हा आणि शाहामृग.

एके दिवशीं एका कोल्ह्यानें एका शाहामृगास आपल्या घरीं

जेवावयास बोलाविलें, आणि त्याची थट्टा करावी ह्मणून एका सुंदर ताटांत खीर घालून त्यापुढें ठेविली; मग दोघांकडून दोघेजण खाऊं लागले; तेव्हां शाहामृगाची चोंच लांब, तीतून खीर घेतां यावी ह्मणून यानें नाना उपाय केले, परंतु घेतां येईना. तितक्यांत कोल्हा ती सगळी खाऊन ताट चाटूं लागला. शाहामृग आपल्या मनांत ओशाळा होऊन तसाच उपाशीं घरीं गेला. तें कोल्ह्याचें कृत्रिम मनांत धरून कांहीं दिवस लोटल्यावर त्या शाहामृगानें कोल्ह्यास मेजवानी केली, आणि एका सुरईंत आंबरस भरून त्यापुढें ठेविला. त्या भांड्याचें पोट मोठें, गळा लांब आणि बारीक होता, त्यांत कोल्ह्याचें तोंड शिरकेना. त्यासमयीं शाहामृगानें आंत मान घालून कसें खावें तें त्यास दाखविलें. सारांश, शाहामृग यथास्थित धाला. तो आंबरस खात असतां जेव्हां जेव्हां मान बाहेर काढी, तेव्हां तेव्हां जे भांड्यावर थेंब पडत, ते चाटून कोल्ह्यानें वेळ मारून नेली; परंतु मनांत फार खट्टू झाला; मग आपल्या घरीं जातेसमयीं तो शाहामृगास ह्मणतो, गड्या, त्वां जें केलें तें यथायोग्य केलें; म्यां तुला केलें, तसें त्वां मला केलें यांत मला वाईट वाटायास प्रयोजन नाहीं.

## तात्पर्य.

दुसऱ्याची थट्टा करून समाधान पावणें हें भल्या मनुष्याचें काम नव्हे; जो असें करितो त्याची मग दुसऱ्यानें उलटून थट्टा केली असतां त्यानें चिडूं नये. आपला खोटा रुपया आपणास कोणी परत केला असतां पदरीं घ्यावा, जसें कोल्ह्यानें केलें. तसें न क-

रून दुसऱ्यानें आपली अमर्यादा केली ह्मणून आपण त्यास दोष ठेवितों, हें ठीक नव्हे. आपणास वाईट वाटलें, असेंच त्यास वाईट वाटलें असेल; असा आपण विचार करावा.

---

## गोष्ट २१.

## कोल्हा आणि सिंह.

एका कोल्ह्यानें पहिल्यानेंच सिंहास पाहिलें. तेव्हां तो भयाभीत होऊन त्याच्या पायां पडला, आणि केवळ दीनवाणीनें भाषण करूं लागला. दुसऱ्या भेटीस अवसान धरून तो त्याच्या तोंडाकडे पाहून बोलूं लागला; आणि तिसऱ्या वेळेस तर जवळ जाऊन त्याशीं सलगी करूं लागला.

### तात्पर्य.

आपणाहून थोर आहेत त्यांशीं वर्तणूक करण्याच्या कोल्ह्याचे आचरणांत ज्या दोन रीति दिसल्या, तशा नसाव्या; एक भय पावून केवळ दीनपणा दाखविणें; दुसरी, मर्यादा सोडून बरोबरीच्या नात्यानें वागणें. तर भयानें न घाबरतां, अथवा धट्टाईनें बरोबरी न करितां, आपला भार राखून मर्यादेनें थोरांशीं वर्तणूक करावी.

---

## गोष्ट २२.

## कोळसे विकया आणि परीट.

एक कोळसेविकया एका नगरांत धंद्याकरितां गेला होता, तेथें त्याच्या गांवच्या एका परटाची आणि त्याची गांठ पडली. त्यांनीं एकमेकांचें क्षेम कुशल पुसून बिऱ्हाडें विचारिलीं; तेव्हां कोळसेविकया परटास ह्मणाला, तुझें बिऱ्हाड सोईचें नाहीं. तूं माझ्या बि-

ऱ्हाडीं फेकून राहा. परीट ह्मणाला, मित्रा, तें कसें होईल? तुजसंगती राहिलों असतां, मी जें वस्त्र प्रातःकाळीं धुऊन आणीन त्यास तुझ्या कोळशांची धळ संध्याकाळ झाला नाहीं तों काळें करील.

**तात्पर्य.**

ह्या जगांत कोणाशीं समागम करावयाचा तो मोठा विचार पाहून केला पाहिजे. आपण मोठे गुणी आहों, परंतु निरंतर दुर्गुण्याशीं संगत आहे, तर तो आपणास आपल्यासारखें करीलच. यास्तव जो विचारवंत, आणि जो आपलें बरें इच्छितो आहे, त्यानें कुमनुष्यापासून दूर राहावें. त्याची संगत समूळ नाश करील. त्याचा समागम करून आपण निर्लेप राहिलों, तरी लोकांस तसें दिसणार नाहीं संगतीच्यायोगानें त्याचें आपलें असें मिसळून जाईल कीं, मग त्यांतील काळें कोणाचें आणि गोरें कोणाचें इतकें निवडावयाचा श्रम लोक घेणार नाहींत. प्रतिष्ठा स्वच्छ झऱ्याच्या पाण्यासारिखी आहे. तें जसें गांव ओहोळास मिळून वाहूं लागलें असतां गढूळ होतें, तशीच दुष्टाच्या संगतीनें प्रतिष्ठा मळीण होते.

---

## गोष्ट २३.

## खोंकड आणि बोका.

एक खोंकड आणि एक बोका, आपण सोबतीनें देश फिरायास जाऊं, अशी प्रतिज्ञा करून निघाले. वाटेनें करमणूक व्हावी, ह्मणून शास्त्राच्या गोष्टी बोलत चालले. खोंकड ह्मणतें, रे, गड्या, तुला कसें वाटतें? माझे विचारास असें येतें कीं, दयेसारिखा दुसरा गुण नाहीं. बोका उत्तर करितो, दादारे, माझेंही मत तसेंचआ-

हे. दयेची शोभा दुसऱ्या कोणत्याही गुणास येणार नाहीं. ह्या-प्रमाणें एकमेकांस सांगत, व एक मेकांच्या बोलण्याची वाखाणणी करीत चालले आहेत, तों जवळच्या रानांतून एक लांडगा निघाला; त्यानें समोरच एक कळप होता त्यांतून एक कोंकरूं उचलून नेलें. त्या कोंकरानें मोठी आरोळी केली, त्याची त्यास दया न येतां तत्काळ त्यानें त्यास भक्षून टाकिलें. हें पाहून मो-ठ्या आवेशानें बोका ह्मणतो, कायहो, केवढें क्रूर कर्म ह्या दुष्टानें केलें! ह्याला भक्ष पाहिजे, तर ह्यानें लहान सान जीवजीवडे खावयाचे होते; हें बिचारें निरपराधी कोंकरूं ह्यास मारून खावें काय? खों-कड ह्मणतें खरेंचरे बोकोबा. असला क्रूरपणा फार वाईट! असा निर्दय स्वभाव झाला आहे, त्याला सुखाचा अनुभव कसारे होईल? ह्याप्रमाणें ते बोलत चालले असतां एका घरापाशीं पोहोंचले; ते-थें, वाडग्यांत, एक पुष्ट कोंबडा मोठ्या डौलानें छाती वर करून चालतांना खोंकडानें पाहिला; तो त्याच्या दृष्टीस पडतांच, त्याच्या दयेची वृत्ति मावळून त्यानें कोंबड्यावर झडप घातली, आणि एके क्षणांत निःशंकपणें त्यास गट्ट केलें. खोंकड इकडे हें कर्म करीत आहे इतक्यांत लठ्ठ एक उंदीर त्या घरांतून निघाला. तो पाहा-तांच बोक्याच्या मनांतली दया नाहींशी होऊन, त्यानें उशीर न लावतां त्यास भक्षून टाकिलें.

## तात्पर्य.

जीं कर्में प्रसंग पडल्यास जातीनें निःशंकपणें करावीं, तींच दुसऱ्यानें केलीं पाहून आपण त्यास दोष द्यावा, असा मनुष्याचा स्वभाव आहे. तसेंच सदाचरणाच्या गोष्टी बोलणें हें एक वेगळें,

आणि सदाचरण करणें हें एक वेगळें. बोलणे सोपें, पण करणें कठिण आहे. जे कधींही सदाचरण करीत नाहींत, ते देखील प्रसंगानुसार सदाचरणाच्या गोष्टी चांगल्या बोलतात.

---

## गोष्ट २४.

## गवताच्या गंजीवरील कुतरा.

एक कुतरा गवताच्या गंजीवर बसला होता, तेथें एक भुकेला बैल गवत खावयास आला; तें न साहून तो त्याजवर भुंकूं लगला. तेव्हां बैल त्यास धिक्कारून ह्मणतो, अरे कुचक्या प्राण्या! हें गवत तूं खात नाहींस, आणि दुसऱ्यासही खाऊं देत नाहींस, असा जो तूं दुष्ट त्या तुला सदां विपत्ति असोत.

### तात्पर्य.

मत्सरासारिखा दुसरा द्वाड मनोविकार नाहीं. कामक्रोधादिक जे इतर मनोविकार आहेत, ते कांहींवेळ राहून शांत होतात. परंतु हा कधींही शांत होतनाहीं; अधिकाधिक वाढतच जातो; आणि जंवजंव वाढतो, तंवतंव, अधिकाधिक संतापच करितो; कांतर दुसऱ्याची विद्या, धन, प्रतिष्ठा पाहून, तें सर्व आपणास असावें, आणि त्यास नसावें, अशा वासना ज्या होतात, त्या कशा पूर्ण होतील? आणि मत्सऱ्यास सुख कसें होइल? ह्मणून मत्सरी निरंतर दुःखितच राहतो.

---

## गोष्ट २५.

## गळकरी आणि मासा.

एका मनुष्यानें नदींत गळ टाकिला, त्यास एक मासा लाग-

ला; तो बाहेर काढून टोपलींत टाकितो आहे, इतक्यांत तो मासा त्याची प्रार्थना करूं लागला, हे पुण्य पुरुषा ! कृपा करून मलापुनः नदींत टाक. गळकऱ्यानें त्यास पुसलें, अरे, म्यां तुजवर एवढा उपकार कां करावा, तें सांग! मासा बोलतो, मी लहान बालकआहें, ह्मणून जसा मोठा होऊन पुढें उपयोगीं पडेन, तसा आज तुझ्या उपयोगीं पडणार नाहीं. गळकरी उत्तर करितो, होय, ती गोष्ट खरी, परंतु प्राप्त सोडून अप्राप्तावर आशा ठेवणारा असा मी मूर्ख नव्हें.

## तात्पर्य.

जो पुढले भरवशावर हातीं लागलेली वस्तु सोडितो, त्यास दोन्ही नाहींशीं होतात. न मिळाल्या वस्तूची इच्छा करावी, ह्यांत कांहीं वांकडें नाहीं; परंतु तिचे भरवशावर हातचें टाकणें, तें बहुतकरून पुढें खेदास कारण होतें.

## गोष्ट २६.

## गाढव आणि सिंह ह्यांची पारध.

कोणा एकेसमयीं एका सिंहास इच्छा झाली कीं, गाढवास संगतीं घेऊन पारधीस जावें. त्यानें गाढवास सांगितलें कीं, तूं एका झाडांत दडून बैस; अमुकवेळेस अवचित् मोठयानें भयंकर शब्द करूं लाग, तो खोलंबवूंकको; ह्मणजे भयानें घाबरीं होऊन सावजें पळूं लागतील. मी बारी धरून राहतों; त्या वाटेनें जें येईल तें हाणीत जाईन. मग त्या गाढवानें तसें केलें असतां, सावजें पळूं लागलीं. सिंह बारीवर होता तो एकेकास मारीत गेला. तीं त्याच्या पोटभरी पुरतीं झालीं, तेव्हां तो गाढवास हाक मारून ह्म-

णतो, गाढवा, भलें केलें, गड्या, भलें केलें; आतां पुरे कर, आणि इकडे ये तें ऐकून गाढव सिंहापाशीं आला; आणि आपण काम चांगलें बजाविलें, असें मनांत आणून लाडानें त्यास पुसतो, सिंह दादा, म्या केलें तें तुला मानवलेंना? सिंह ह्मणाला मानवलें ह्मणूनकाय सांगूं! रे फारच मानवलें; रे गाढवा, त्वां असें केलें कीं जर तुझें स्वरूप मला ठाऊक नसतें, तर मीही तो शब्द ऐकून पळालों असतों.

### तात्पर्य.

कित्येक ह्या गाढवासारिखे मोठमोठाल्या गर्जना व वल्गना करून अजाणत्या लोकांस भय उत्पन्न करितात; परंतु जे त्यांचें स्वरूप ओळखतात त्यांस तें कौतुक मात्र होतें. तर असले पुरुष जेथें आढळतील, तेथें त्यांचा अंमळ बारिकपणें शोध मात्र करावा. ह्मणजे दिसून येईल कीं, त्यांपासून भय पावावयास प्रयोजन नाहीं.

---

## गोष्ट २७.

### गाढव, सिंह आणि कोंबडा.

एक गाढव आणि एक कोंबडा हे दोघे एका ठिकाणीं चरत होते; इतक्यांत समोरून एक सिंह येत होता तो त्यांनीं पाहिला. त्यासमयीं कोंबड्यानें मोठा शब्द केला; सिंह कोंबड्याच्या शब्दास फार भीत असतो; त्यानें, तो शब्द कानीं पडतांच, मोठ्या त्वरेनें मागें धांव घेतली. तें पाहून गाढवास वाटलें कीं, तो आपणास भिऊन पळाला, ह्मणून तो जलदी करून सिंहामागें लागला. तो कोंबड्याचा शब्द ऐकूं येईना इतका दूर गेला असतां सिंहानें मागें उलट खाऊन त्याची नरडी धरिली. त्यावेळीं

गाढव मनांत ह्मणतो, रेरे, मी मूर्ख केवढा तो पहा; आपला दुर्बळपणा जाणत असतांही, उसनें अवसान आणून ह्या मृत्यूच्या तोंडांत पडलों. नाहींतर ह्यावेळेस आपल्या कुटुंबांत स्वस्थ असतों.

### तात्पर्य.

आंगचें अवसान नसतां जो तें उसनें आणावयास जातो, तो फशीं पडतो. ठिकाणाच्या अथवा संगतीच्या माहात्म्यानें एकाद्या समयीं आपणास कोणी भ्याला, त्याजवरून तो आपणास दबतो, असा निश्चय करून त्याशीं एकाएकीं गांठ घालावयास जाऊंनये. त्याचें आपलें सामर्थ्य पाहून वर्तावें.

---

## गोष्ट २८.

### गांवढेकर आणि साप.

एका गांवढेकऱ्या कुणब्यानें, थंडीच्या दिवशीं परसांत काम करीत असतां, वईपाशीं पडलेला एक साप पाहिला, तो थंडीच्या गारवठ्यानें फार व्याकूळ, अर्धघटकेनें किंवा घटकेनें मरणार, असा पाहून कुणब्यास दया आली. मग त्या सापास त्यानें घरीं नेऊन विस्तवापाशीं ठेविलें. तेथें शेकाच्या योगानें दाहा पांच पळांनीं हुशार झाल्यावर, उभा राहून फुत्कार करून, कुणब्याच्या बायकामुलांच्या आंगावर उड्या टाकूं लागला; तेव्हां त्यांची दाणादाण झाली. कुणबी परसांत होता तो ती आरडाओरड ऐकतांच कुऱ्हाड हातीं घेऊन आला, त्यानें एका घायानें सापाचे दोन तुकडे केले. साप मरतेसमयीं त्यास हे शब्द बोलला, अरे दुष्टा! ज्यानें तुझा जीव वांचविला त्याचे उपकार असे फेडतोस काय! आत

तुझा मरण योग्य आहे; परंतु अरे महापाप्या! तुझ्या अपराधास नु- सत्या मरणापेक्षां कांहीं अधिक शासन असावें.

### तात्पर्य.

जो आपल्या हितकर्त्याचा घात करितो, अथवा ज्याचें अन्न खातो त्याजवर फिरतो, तो कृतघ्न, महा पापी; तो मेलेला बरा त्याचें तोंड पाहूंनये. घातक्याच्या हातीं अधिकार देणें, किंवा कृतघ्नावर उपकार करणें हीं दोनही अनाठायीं घालविणें असें आहे.

---

## गोष्ट २९.

### गोठ्यांतील सांबर.

कोणी एक सांबर पारध्याच्या कुतऱ्यांनीं झाडींतून हुसकून दिलें, तें पळत पळत एका खेड्यांतील गुरांच्या गोठ्यांत शिरून गवताच्या गंजींत राहिलें; तें पाहून तेथील एक बैल त्यास ह्मणतो, रे, त्वां एथें येऊन काय योजिलें आहे? मला असें वाटतें कीं, ज्यास भिऊन तूं लपलें आहेस, तें मरण तुला एथें लागलेंच प्राप्त होईल. सांबर त्यास ह्मणतें, मित्रहो, जर तुह्मी सर्व कृपाकरून उगे राहाल, तर माझा निभाव होईल; सवड साधून मी एथून लवकरच जाईन. मग तें सांबर संध्याकाळपर्यंत तेथें होतें. संध्याकाळ होतांच प्रथम गवताच्या पेंढ्या घेऊन गुराखी गोठ्यांत आला तेव्हां त्याच्या दृष्टीस तें पडलें नाहीं; त्या नंतर वाड्याचा कारभारी आला, त्यानेंही त्यास पाहिलें नाहीं; त्यासमयीं सांबराच्याठायीं हर्ष मवेना; तें बैलांस ह्मणूं लागलें, गड्यांनो, तुह्मी धन्य आहां! आज मी वांचलों तो तुमच्या धर्मानें; तुह्मांसारिखे परोपकारी कोठें ही नसतील. तें ऐकून त्यां-

तील एक बैल त्यास ह्मणतो, रे, त्वां एथून त्वरेपणीं निभावून आ-पल्याठिकाणीं जावें, हें आमच्या मनापासून आहे, तर ईश्वर करो, आणि या वाड्याचा धनी एथें न येवो ! त्यास शंभर डोळे आहेत; तो आला असतां त्याच्या दृष्टीपुढें तुला या गवतांत लपून राहावणार नाहीं. असें बोलताहेत तों, वाड्याचा धनी बाहेर गेला होता तो घरींआला; येतांच प्रथम गोठ्यांत गेला, आणि चाकरांवर चरफडून ह्मणतो, रे,राम्या, ह्या बैलापुढें वैरण कांरे नाहीं? रे, मी नित्य हाका मारीतों, तरी तुह्मांस लाज कशी नाहीं ? रे, सोन्या, त्या बैला पुढें दुसऱ्या चार पेंढ्या आणून घाल; काय हो, कशीं द्वाड माणसें हीं! असा चरफडत चरफडत इकडून तिकडे फिरतो आहे, आणि सर्वत्र निरखून पाहातो आहे, तों, गवतांत सांबराचीं शिंगें त्याच्या दृष्टीस पडलीं; तीं पाहतांच तो चाकरांस ह्मणतो, हें रे काय या गवतांत? रे, सांबर, रे धांवा रे, धांवा! तें ऐकतांच चाकर बडगे घेऊन धांव-ले, त्यांनीं तत्काळ त्या सांबराचा प्राण घेतला.

## तात्पर्य.

आपल्या घरच्या कामाची काळजी आपण जितकी बाळगितों, तितकी चाकर बाळगीत नसतात; होईल तसें होवो असें ह्मणून ते निश्चित असतात; ज्याचें अन्न खावें त्याचें हित होईल तें करावें, हा जो सेवकांचा धर्म, तो त्यांच्या स्वप्नींही नसतो; त्यांचें चित्त सर्वकाळ आपल्या स्वार्थावर असतें; तो ज्यांत साधेल तें ते करीत असतात; त्यापुढें धन्याचें हित त्यांस दिसत नाहीं. पाहिलें असतां आंगच्या उधळेपणामुळें मोडलेले असे श्रीमंत थोडकेच निघतील; परंतु चा-करांनीं नाडिल्यामुळें धुळीस मिळालेले असे पुष्कळ. ह्यासाठीं ध-

त्यानें आपल्या कामास आपण स्वतः सावध असावें; केवळ चाकरां- च्या विश्वासावर त्यानें राहूं नये.

---

## गोष्ट ३०.

## घरांतील माशी आणि मधमाशी.

एक घरांतील माशी मधमाशांच्या पोळ्याजवळ उडत भागडत होती. तिला एक मधमाशी रागाचा आवेश आणून ह्मणत्ये, तूं कांगे आह्मांत शिरत्येस? हो दूर! घरमाशी ह्मणत्ये, कांगे बाई राग भरत्येस? मला तुझ्याशीं बोलावयाचें नाहीं. व तुझ्याशीं संगत क- रायाची नाहीं; तुह्मां भांडखोरलोकांशीं जो संगत करील तो वेडा. हें ऐकून मधमाशी विकोपास जाऊन विचारत्ये, कायगे, चांडाळ- णी, तूं आमचा इतका अनादर करित्येस? आमच्यासारख्या रीति संप्रदाय कोणांतही नाहींत; आह्मांमध्यें कायदे व व्यवस्था हीं सर्वां- हून उत्तम आहेत; आमचें खाणें सुगंध पुष्पें, आमचें काम मध क- रणें; जो मध अमृतासारिखा गोड. तुह्मीं नीच लोक, नासकें कु- सकें, वाईट तें तुमचें खाणें. घरमाशी ह्मणत्ये, आमची जात दरि- द्री खरी; जें आह्मास मिळतें तें खातों; पण दारिद्र्यांत कांहीं पाप नाहीं, तुह्मांला जो क्रोध आहे तो पापच आहे. तुह्मी मध करितां तो गोड खरा, पण तुह्मां सर्वांचें मन कितीं कडू आहे! तुह्मी आ- पल्या शत्रूचा सूड उगविण्याकरितां आपला प्राण ही देतां; असें करून शत्रूस जो उपद्रव तुह्मी करितां त्याहून आपणास दुप्पट उ- पद्रव करून घेतां. मी ह्मणत्यें ही गोष्ट खरी माना; तुमचा स्वभाव चांगला असता आणि तुमचें चातुर्य कमी जरी असतें, तरी चिंता नवती; त्यांतच तुमचें बरें असतें.

### तात्पर्य.

बुद्धि आणि चातुर्य हीं मोठीं आहेत, आणि स्वभाव चांगला गोड नाहीं, तर समाधान व्हावयाचें नाहीं. समाधान होण्यास स्वभाव चांगला असणें हेंच मुख्य साधन.

---

## गोष्ट ३१.

### घार आणि कुणबी

एक घार एका खबुतराच्या पाठीस लागली होती; ती कुणब्यानें कवडे धरायास जाळें लाविलें होतें, त्यांत सांपडली. त्यावेळीं ती पांख फडफडवित्ये आहे आणि सुटून जाण्याविषयीं यत्न करित्ये आहे तों तो कुणबी जवळच काम करीत होता, त्यानें येऊन तीस धरिलें, आणि मारूं लागला. तेव्हां ती काकुळतीस येऊन त्यास विनंति करित्ये कीं, मला जीवदान दे. पहा! मजपासून तुला कांहीं उपद्रव झाला नाहीं; मी खबुतरामागें लागल्यें होत्यें. तीस कुणबी उत्तर करितो, बरें तर, खबुतरानें तरी तुझा काय अन्याय केला होता ! असें ह्मणून त्यानें तिचें शीर आणि धड त्या क्षणीं वेगळें केलें.

### तात्पर्य.

परपीडा करणें हें मुळींच वाईट,ती थोरास किंवा लहानास असो; तिची व्यथा दोघांसही सारखी; तेणेंकरून दोषी होणें हें चुकतनाहीं.

---

## गोष्ट ३२.

### घोडा आणि सांबर.

एक घोडा आणि एक सांबर एका कुरणांत नित्य एकत्र च-

रत असतां, एके दिवशीं उभयतांची बोलाचाली झाली. सांबरानें आपल्या शिंगांच्या बळानें घोड्यास कुरणाबाहेर काढून दिलें, तेव्हां सांबराचें पारिपत्य करावें ह्मणून घोडा माणसापाशीं गेला आणि पाठराख करावी ह्मणून प्रार्थना करूं लागला. माणसानें त्याच्या पाटीवर खोगीर घातलें, तोंडीं लगाम दिला, आणि आपण वर चढून बसला. फेर फटका करून पाहतां कुल्यावर चार फटकेही मारिले. घोड्यानें तें सर्व सोसून माणसाच्या हातून सांबराचा पराजय करविला; नंतर माणसास बोलतो, हे, सुमनुष्या! माझें कार्य झालें. मी तुझा फार उपकारी झालों. आतां हें खोगीर, लगाम, काढून मला जाऊंदे. तें ऐकून मनुष्य बोलतो, गड्या, तूं इतका उपयोगी आहेस हें मला समजलें नव्हतें; आतां तूं ह्या बंधनापसून सुटशील असें मला दिसत नाहीं.

### तात्पर्य.

कोणा एकाचें पारिपत्य करावें ह्मणून दुसऱ्यास शरण जातां फार विचार करावा. एकवेळ बळिष्ठाच्या लगामांत कोणी सांपडलें आसतां, पुन्हा मोकळीक होईल याचा भरवसा नाहीं.

---

### गोष्ट २२.

## चित्ता आणि कोल्हा.

एकेसमयीं कोणा एका चित्त्यास असें वाटलें कीं, माझ्या कातडीवरील विचित्र आणि सुंदर ठिपके पाहतां, देखणेपणाविषयीं माझी बरोबरी सिंहास देखील होणार नाहीं; मग इतरांची काय कथा ! मग तो पशुमात्राचा तिरस्कार करूं लागला. त्यास कोल्हा ह्मणाला, बाबा, तूं फार चुकतोस; तर मी सांगतों हें खरें मान कीं,

अंगील सद्गुणांच्या भूषणांवांचून बाहेरच्या भूषणास युक्त आहेत ते भूषण ह्मणत नाहींत.

### तात्पर्य.

जो सुंदर, आहे तो, मी सुंदर, असा गर्व नकरितां जर वर्तेल, तर त्याचा सुंदरपणा त्यास फार शोभा देईल. गुणी आणि सुंदर आहे ह्याचे स्त्रीची कीर्ति वाढत्ये.

---

## गोष्ट ३४.

## चिमणी आणि ससा.

एक गरुडपक्षी सशास धरून त्याच्या बोकांडीस बसला होता. तेथें जवळच झाडावर एक चिमणी होती, ती त्यास ह्मणत्ये, रे, तूं पुरता मूर्ख आहेस. धिक् जिणें तुझें. अरे. तूं उगाच राहून व्यर्थ कां आपणास मारवितोस ? ऊठ आणि चालता हो. मला असें वाटतें, जर तूं यत्न करशील, तर जातीचा चपळ आहेस, शत्रूच्या हातून सहज निघून जाशील. ह्याप्रमाणें ती त्यास तिरस्कार करून बोलत आहे, इतक्यांत एका ससाण्यानें झेंप घालून तीस उचलिलें; त्यासमयीं तिनें पुष्कळ विलाप केला परंतु तें मनास न आणितां ससाणा तीस घेऊन चालला. तें पाहून ससा मरतेवेळेस समाधान पावून तीस ह्मणतो, अगे, तूं आपणास निर्भीक मानून मला हिणावीत होतीस, त्यास तुजवरही तोच प्रसंग पडला आहे, तर आतां कशी वहिवाटत्येस तें पाहूं.

### तात्पर्य.

जे दुसऱ्यास मात्र शास्त्रार्थ सांगतात, आणि आपणावर बितली असतां घाबरतात, ते पुरुष उपहासास पात्र होतात.

## गोष्ट ३५.

## चिलट आणि सिंह.

एके सिंहाच्या गुहेपुढें एके दिवशीं, एक चिलट गुणगुण शब्द करीत इकडे तिकडे उडत वागडत होतें; तें सिंहास वाईट वाटून तो चिलटास ह्मणतो, रे नीचप्राण्या, जा एथून लवकर. आपण सिंहास कांहीं केलें नसतां सिंहानें आपला धिकार केला, ह्मणून चिलटास वाईट वाटून त्यानें सूड उगविण्याचा निश्चय केला; आणि सिंहाच्या कानांत भसकन शिरून त्यास डसाडस केली. मग तेथून निघून पोटाखालीं मर्मस्थानीं जाऊन डांस घेतले; मग शेवटीं त्याच्या नाकपुड्यांत जाऊन फारच उपद्रव केला. तेव्हां त्या वेदनेनें सिंह कासावीस होऊन, हातपाय आपटून, गडबडां लोळूं लागला. ह्याप्रमाणें सूड उगवून चिलट आपले पंख थरारवीत उडून गेलें; आणि जायाच्या आनंदानें आपण कोणीकडे जातों, हें लक्षांत न ठेवितां तें एका कोळ्याच्या जाळ्यांत जाऊन सांपडलें. कोळ्यानें तत्काळ त्यावर झांप घालून, त्याचा प्रण घेऊन त्याच्या आंनदाचा शेवट केला.

### तात्पर्य.

कोणी इतका पामर नाहीं कीं, त्याच्यानें दुसऱ्यास उपद्रव करवणार नाहीं; ह्मणून कोणी कोणास अगदीं हलकें मानून त्याचा तिरस्कार करूंनये. तसेंच आपला जय झाला ह्मणून जो आपणास हर्ष होतो, तो आपलें देहभान जाई इतका होऊं देऊंनये. जो जयाच्या आनंदानें बेशुद्ध होतो, तो मिळविलेलें यश गमावून एखाद्या अनर्थांत जाऊन पडतो.

### गोष्ट ३६.

## चोर आणि पोर.

एक पोर चोरास पाहून विहिरीवर रडत बसला. चोरानें त्यास पुसलें, कां रडतोस ! तेव्हां तो पोर स्फुंदून स्फुंदून ह्मणतो, माझें रुप्याचें भांडें दोरीतुटून विहिरींत पडलें. आतां मी काय करूं ! मला घरीं आईबाप मारतील. हें ऐकून तत्क्षणीं चोरानें आपलें गांठोडें, व आंगावरील चिरगुटें, विहिरीवर ठेविलीं, आणि आंत उतरून बहुतवेळपर्यंत भांडें शोधिलें, परंतु सांपडलें नाहीं. मग निराश होऊन वर आला, पाहातो तों मुलगा दृष्टीस पडत नाहीं, आणि गांठोडें व चिरगुटेंही नाहींत. तों तो पोर घेऊन पळून गेला.

### तात्पर्य.

जे लोक दुसऱ्यास फसवून स्वार्थ साधितात, तेही एकादेवेळेस फसून जवळ असतं त्यास मुकतात.

---

### गोष्ट ३७.

## डुकरी आणि कुतरी.

एकेसमयीं डुकरी आणि कुतरी ह्यांची गाठ पडली असतां, लवकर कोण वित्ये ह्मणून उभयतांचा वाद लागला तेव्हां कुतरी बोलत्ये, मी एकेएके खेपेस पुष्कळ पिलें वित्यें, आणि माझे विण्यास फार महिनेही लागत नाहींत. डुकरी ह्मणत्ये, गे, तें खरें परंतु विण्याविषयीं दर खेपेस उतावीळ होत्येस, ह्मणून तुझीं पिलें आंधळीं उपजतात. तसें मला होत नाहीं.

### तात्पर्य.

उतावळीनें जें काम केलें तें कच्चें राहतें.

---

## गोष्ट ३८.

## डोमकावळा ज्यानें मोराचीं पिसें आंगास लाविलीं होतीं.

कोणाएका डोम कावळ्यास असें वाटलें कीं, आपण थोर व्हावें; आपल्या जातीचे लोक हलके, त्यांचा समागम आपण करूंनये. असें मनांत आणून त्यानें मोराचीं कांहीं पिसें गोळा केलीं; आणि तीं आपल्या पाखांत रोवून तो मोरांचे मंडळींत शिरला. मोर त्यास पाहातांच ओळखून त्याच्या भोंवताले मिळाले; आणि त्यांनीं त्यास प्रथम चोंची मारून अर्धमेलें केलें; मग त्यापासून तीं खोटीं पिसें बुच्याटून घेऊन त्यांनी त्यास आपल्या मंडळींतून हांकून दिलें. अशी अवस्था झाल्यावर, तो खिन्न होऊन आपल्या जातींत फिरून शिरावयास लागला. कावळ्यांस त्याचे पूर्वींचे ढंग ठाऊक होतेच, ह्मणून त्यांनी त्यास जवळ येऊं दिलें नाहीं. आणि त्यांतून एका कावळ्यानें त्यास छी थू करून ह्मटलें रे मूर्खा, ईश्वरानें तुला ज्या जातींत निर्माण केलें, ती त्वां सोडिली नसती, तर आज तुला हा अपमान कां प्राप्त झाला असता.

### तात्पर्य.

ईश्वरानें आपणास ज्या स्थितींत निर्माण केलें आहे, ती वाईट मानून, दुसऱ्याचा थोरपणा आपल्याठायीं ओढून आणावयास गेलों असतां, आपण विपत्तींत पडतों; आणि आपल्या बरोबरीच्यांचे म-

नांत आपला कंठाळा आणितो. असा पुरुष जो असतो, तो दोहींकडून फसतो; ज्यांचा थोरपणा तो आपणाकडे ओढून आणावयास पाहातो, ते त्याचा तिरस्कार करून उपहास करितात; आणि आपल्या स्थितीचा द्वेषी ह्मणून त्याच्या बरोबरीचे त्याचा अंगीकार करीत नाहींत.

---

## गोष्ट ३९.

## डोमकावळा आणि खबुतरें.

एका खुराड्यामध्यें खबुतरें राहात होतीं. त्यांच्या मंडळींत पिसें पांढरीं करून एक डोमकावळा शिरला. त्यानें मौन धरिलें होतें, ह्मणून तो खबुतरांच्या लक्षांत आला नाहीं. असे कित्येक दिवस गेले, मग एके दिवशीं कावळ्यास आपल्या स्वरूपाचें भान न राहतां तो काकावूं लागला; त्यावरून तो कोण आहे तें समजून, खबुतरांनीं त्यास शिक्षा करून हांकलून दिलें. तो पुन्हा आपल्या मंडळींत गेला; तेव्हां त्याचीं तीं चित्रविचित्र पिसें पाहून हा आपल्यांतला नव्हे, ह्मणून त्यास डोम कावळ्यांनीही पिटून लाविलें. ह्याप्रमाणें तो कावळा आपल्या आंगीं नसतां योग्यता आणावयास गेला, तों होती तीसही मुकून कावळा ना खबुतर असा झाला.

### तात्पर्य.

वेषधारी आहेत त्यांचें इतकें एक बरें आहे, कीं ते फार दिवस लोकांस ठकवूं शकत नाहींत त्यांचें बोलणें, किंवा आचरण, एकाद्या वेळेस तरी त्यांच्या सोंगास उणें अधिक पाडतें, तेणेंकरून त्यांचा खोटेपणा लवकरच सुज्ञ पुरुषांच्या लक्षांत येतो.

---

## गोष्ट ४०.

## तरुणा आणि सिंहाचें चित्र.

एक म्हातारा मनुष्य कोट्याधीश होता, त्यास एकच मुलगा होता; त्यावर त्याची अत्यंत ममता असे. त्या मुलास पारधीचें व्यसन लागलें; तें पाहून माझ्या लेंकाची गत कशी होईल! म्हणून म्हातारा नित्य काळजी वाहूं लागला. एके दिवशीं त्यास स्वप्न पडलें कीं, अरण्यामध्यें लेंकास सिंहानें फाडून खालें. तें नजाणो खरें होईल. या भयाने म्हाताऱ्याने एक मोठा वाडा बांधून त्यास भोंवताला कोट करून त्यांत मुलास अडकवून ठेविलें. त्या वाड्यांत मुलाचें चित्त रमायासाठीं त्याने सर्व प्रकार अनुकूळ केले. नानाप्रकारचीं चित्रें चितरविलीं, आणि जीं जीं सावजें मुलाच्या आवडीचीं होतीं त्यांचीं चित्रें भींतीवर टांगविलीं. त्यांमध्यें एक सिंहाचेंही चित्र होतें. एके दिवशीं तें सिंहाचें चित्र पाहून मुलास फार क्रोध आला कीं, स्वप्न खरें होईल असें मानून बापाने मला कोंडून ठेविलें आहे, तें ह्या दुष्टा सिंहामुळें! मग तो डोळे वटारून त्या चित्रास म्हणतो, रे दुष्टा, मी हें बंदिशाळेचें दुःख भोगितों हें तुझ्यामुळें. मजजवळ, रे, यासमयीं तरवार असती, तर तुझ्या उरांत भोंसकतों, पण काय करूं रे! असें बोलून दांत ओंठ खाऊन आवेशाने त्याने त्या चित्रांतील सिंहाच्या उरांत बुकी मारिली. तेथें आंत भिंतीस एक खिळा होता, तो हातास रुतून घाय झाला; तो विकोपास जाऊन मुलगा त्या दुखण्यानेच मरण पावला. ह्याप्रमाणें बापाने स्वप्न खोटें करावयास जो उपाय केला, तो व्यर्थ जाऊन होणार तें झालेंच.

## तात्पर्य.

स्वप्नावर भरवसा ठेवून खेद किंवा हर्ष मानणें हें मूर्खपण होय. भविष्य कोणास समजत नसतें. एखाद्या नाशाच्या भयानें जर मनास चिंता वाटूं लागली, तर त्याच्या निवारणाविषयीं आपणाकडून करवतील, तितके चांगले उपाय करावे, आणि परमेश्वरावर भरवसा ठेवून स्वस्थ असावें.

---

## गोष्ट ४१.

## दुखणेकरी सिंह, कोल्हा आणि लांडगा.

कोणी एक सिंह रानडुकराचें मांस अतिशयित खाल्ल्यामुळें दुखण्यास पडला; तेव्हां आपल्या स्वामीच्या समाचारास रानांतील पशु कोल्ह्यावांचून बहुतकरून सर्व आले. कोल्हा आला नाहीं असें पाहून त्याचा शत्रु जो लांडगा त्यास वाटलें कीं, कोल्ह्याचा नाश करण्याचा हा प्रसंग चांगला आहे; मग तो सिंहास ह्मणूं लागला, महाराज, स्वामीच्या समाचारास सर्व सेवक मंडळी आली आहे; पण एक कोल्हा मात्र आला नाहीं. तो मोठा अभिमानी, राजद्रोही, आणि कृतघ्न आहे. अशी कोल्ह्याची चाहाडी तो करितो आहे, इतक्यांत कोल्हा हजर झाला; आणि लांडगा आपणाविषयीं काहीं चाहाडी सांगतो असें त्यानें ऐकिलें; मग धन्याची मर्जी आपणावर रुष्ट झाली आहे, असें समजून त्यानें मोठ्या युक्ति प्रयुक्तीनें आपला बचाव करून घेऊन, आपणावर जो अनर्थ येणार होता तो आपल्या शत्रुवर घातला. तो ह्मणाला, महाराज आपल्या चरणापाशीं येऊन स्वामीभक्तीचा आव घालणारे असे सेवक बहुत आले आहेत. मी तर

स्वामीची प्रकृत बिघडली हें ऐकिल्यापासून उपायाच्या शोधांत आहें. मोठमोठ्या वैद्यांपासून सर्वोत्कृष्ट एक उपाय म्यां काढून आणिला आहे; तो असा आहे कीं लांडग्याच्या उष्ण उष्ण रक्ताचा लेप स्वामीच्या पोटावर करावा. कोल्ह्याचें बोलणें ऐकून सिंह ह्मणाला, उपाय चांगला दिसतो; करून पाहूं बरें. जवळ लांडगा होता त्यास पटकन धरून सिंह त्याचें रक्त काढूं लागला; तेव्हां कोल्हा लांडग्याच्या कानांत सांगतो, गड्या, आपणास उपद्रव होऊंनये असें ज्याच्या मनांत असेल, त्यानें दुसऱ्याचें वाईट चिंतूं नये.

### तात्पर्य.

जे दुष्ट आहेत ते दुसऱ्यास गुंतवायासाठीं फांस मांडतात; ते आपणच त्या फांसांत बहुतकरून पडतात; आणि दुसऱ्यावर जो अनर्थ आणावयास ते पाहातात, तो अनर्थ उलटून त्यांवरच येऊन पडतो.

---

## गोष्ट ४२.

## दोन कुत्र्या.

एक कुतरी व्यावयाला झाली. तिनें दुसऱ्या कुतरीची प्रार्थना केली कीं, बाई, एक महिना पर्यंत तुमचें घर मला राहावयास द्या. माझें बाळंतपण झालें ह्मणजे मी तुमचें तुमच्या स्वाधीन करीन. दुसरीनें बरें ह्मणून लागलेंच घर रिकामें करून तिच्या स्वाधीन केलें. पुढें एक महिना झाल्यानंतर घरधनीन व्यालेल्या कुतरीस भेटावयास ह्मणून गेली, आणि मर्यादेनें ह्मणाली. बाई, तुह्मी हातीं पायीं उतरलां हे पाहून मला फार समाधान झालें; आतां तुह्मांस पिल्यां सहवर्तमान घराबाहेर हिंडतां पाहावें, असें मी इच्छित्यें. ति-

चा आशय समजून बाळंत कुतरी तीस ह्मणत्ये, खरेंच बाई, मला- हा भीड वाटत्ये; मी तुमची जागा फार दिवस अडविली आहे. ह्यामुळें तुमचे हाल होत असतील; परंतु काय करूं! माझीं पिलें लहान, अशक्त, अद्यापि माझ्या मागें फिरावयाजोगतीं झालीं नाहींत; तर कृपा करून आणखी मला पंधरा दिवस द्याल तर मी तुमची बहुत उपकारी होईन. घरकरीण फार भिडस्त होती, तिने तिला दुसरेही पंधरा दिवस दिले; तेही निघून गेले तथापि घर रिकामें झालें नाहीं. असें पाहून ती व्यालेल्या कुतरीस ह्मणत्ये, अगे तूं अद्यापि घरांतून निघत नाहीस, तर तुझ्या मनांत म्या तुला बळा- काराने बाहेर काढावें असें आहे काय? मला तर आतां माझी जागा पाहिजे. हें ऐकून व्यालेली कुतरी तीस ह्मणत्ये, काय! तूं मला बळात्काराने बाहेर काढणार? तर आतां काढ; पाहूं कशी काढत्येस ती; मी तुला निक्षून सांगत्यें कीं, तूं मला बळत्काराने काढीस तोंपर्यंत हें घर तुझ्या हातीं येणार नाहीं.

## तात्पर्य.

ह्मण आहे कीं, ज्याच्या हातीं ससा तो पारधी; तशी ज्याच्या स्वाधीन वस्तु तो तिचा धनी. ह्यासाठीं एकादी आपल्या जिवाळ्या- ची वस्तु आहे, ती दुसऱ्याचे हातीं गेली असतां पुन्हा परत येईल, असा दृढ भरवसा आल्यावांचून ती दुसऱ्याच्या हातीं देऊंनये. जे पुरुष शहाणे, उदार आहेत, ते दुसऱ्यास देववेल तें, समयीं अगदीं- च देतात; परंतु जें पतीचें कुळ नव्हे, अथवा लबाडी करील अशी ज्यावर शंका उत्पन्न होत्ये, असल्यास उसनें ह्मणून देणें हा वेडेप- णा होय.

## गोष्ट ४३.

## दोन खेंकड्या.

खेंकड्याचा स्वभाव आहे कीं, वांकडें चालत असावें. कोणा एके दिवशीं एक खेंकडी आपल्या लेंकीस रागें भरली कीं त्वां हा सृष्टीनिराळी चाल कोठून काढली? ही टाक. लेंक ह्मणत्ये, आई, माझ्या बुद्धीप्रमाणें मला नीट दिसतें तें मी करित्ये; तुझ्या मर्जीस जर तें येईना, तर म्यां कसें चालावें तें तूं स्वयें चालून दाखीव, मग तें पाहून मीही तशी चालेन.

### तात्पर्य.

जो गोष्टीविषयीं दुसऱ्यास खोड ठेवितो, तीच गोष्ट आपण स्वयें आचरितो; ह्याहून दुसरें आश्चर्य काय सांगावें? दुसऱ्यास उपदेश करितां सर्वांस येतो परंतु जो त्या उपदेशाप्रमाणें स्वयें वागतो, तो शहाणा ह्मणावा. चांगल्या गोष्टी सांगतो मात्र, तो शहाणा नव्हे.

---

## गोष्ट ४४.

## दोन पाली.

दोन पाली एके भिंतीवर बसून ऊन घेत होत्या. त्यांतून एक बोलूं लागली. काय आमचें जिणें हें! आह्मी प्राणी आहों, परंतु आमची कांहींच योग्यता नाहीं. आह्मांकडे कोणी पाहात नाहीं, व आह्मी कोणाच्या लक्षांत येत नाहीं. धिक् हें आमचें जन्म! आह्माला ह्यापेक्षां सांबराचें जन्म कांझालें नव्हतें? मी सांबर झाल्यें असत्यें, तर अरण्यांत फिरून सर्व पशूंमध्यें शेखी मिरविली असती, आणि सर्वांचें पायां पडून घेतलें असतें. ती ह्याप्रमाणें कुरकूर करीत आहे, इत

क्यांत एक सांबर पुढें पळतो आहे, त्याच्या मागें पारध्याचे कुतरे लागले आहेत, असें त्या पालींनी पाहिलें. तो सांबर पळतां पळतां थकून, त्यांच्या पुढें आला तों खालीं पडला, पडतांच कुतऱ्यांनीं त्यास धरून फाडून टाकिलें. हें पाहून दुसरी पाल तीस विचारत्ये, काय गे, जाच्या जन्माची तूं इच्छा करीत होतीस तोचना हा ? त्याच्या जन्माचा परिणाम कसा तो पाहिला ना ? तर ह्यावरून तूं सृष्टिकर्त्याचा उपकार मान कीं, ज्या स्थितींत उपद्रव नाहीं त्या स्थितींत त्यानें तुला जन्म दिलें आहे.

## तात्पर्य.

उंच उंच स्थितींत भयें फार असतात. आणि हलक्या स्थितींत भयें थोडीं असतात. तिकडे सन्मान अधिक, तर इकडे निर्भयपणा अधिक; ह्यावरून हिची तिची बराबरी आहे; ह्मणून हलक्या स्थितीचा कंटाळा कोणी करूं नये.

---

## गोष्ट ४५.

## दोन बेडूक.

कोणा एकेसमयीं मोठा उन्हाळा पडला असतां, तळीं, विहिरी, हीं सर्व आटून गेलीं. त्यावेळेस दोन बेडूक पाण्याचा शोध करीत करीत एका विहिरीपाशीं आले; ती बहुत खोल होती. तिच्या कांठावर बसून विचार करीत आहेत कीं, हींत उडी टाकावी कीं नये टाकूं ? एक ह्मणतो टाकावी; कां कीं विहीर ओंड आहे, ह्मणून खालीं पाण्याचे झरे पुष्कळ असतील, आणि कोणत्याही गोष्टीची अडचण पडणार नाहीं. त्यास दुसरा उत्तर करितो, रे, तूं ह्मणतोस हें सर्व खरें असेल; तरी ही जिवावरची गोष्ट आहे, ह्मणून

तुझ्या विचारास माझ्यानें रुकार देववत नाहीं. जर कां ह्या विहिरींतलेंही पाणी सुकलें, तर सांग, बरें, आपण पुन्हा बाहेर कसे निघूं?

### तात्पर्य.

एकाद्या अवघड कामांत हात घालण्याच्या अगोदर योजना करून ठेवावी कीं, कदाचित् तें फसलें असतां अमुक वाटेनें आपली निभावणी होईल.

---

## गोष्ट ४६.

## दोन भांडीं.

एक मातीचें आणि एक पितळेचें अशीं दोन भांडीं कोणाएका नदीच्या तीरीं ठेविलीं होतीं; तीं वरून पूर येऊन वाहत चाललीं; तेसमयीं मातीच्या भांड्यास चिंता पडली कीं, कदाचित् मी पितळेच्या भांड्यावर आपटलों, तर फुटून जाईन. त्यास कष्टी पाहून, पितळेचें भांडें ह्मणूं लागलें, रे, तूं भिऊं नको, तुला मी संभाळीन, मातीचें ह्मणालें, बाबा, तूं अंमळ दुरूनच बोल, मला तुजपासून भय फार आहे; कांकीं मी तुजवर आपटलों किंवा तूं मजवर आपटलेंस, तरी नाश माझाच होणार.

### तात्पर्य.

श्रीमंताची सोयरीक किंवा संगत गरिबास विपत्तींत पाडिते. श्रीमंताच्या शेजारीं असतां, हा भांडो कीं, तो भांडो, दोहोंकडूनही नाश गरिबाचाच होतो.

---

## गोष्ट ४७.

## दोन वाटसरू.

दोन वाटसरू संगतीनें चालले होते, त्यांतील एकास वाटेंत

पडलेली रुपयांची बटवी सांपडली, ती हातीं घेऊन तो दुसऱ्यास ह्मणतो, रे, ही पाहा मला रुपयांची बटवी सांपडली. दुसरा त्यास उत्तर करितो, रे, मला सांपडली, असें कां ह्मणतोस ? आपणांस सांपडली, असें ह्मण; आपण उभयतां सोबती, ह्यासाठीं लाभ किंवा हानि जें काय होईल तें दोघांचेंच. तें ऐकून बटवीवाला ह्मणतो, होय तर, मला सांपडलेल्या वस्तूचा भाग मी तुला कां देईन ? दुसरा ह्मणाला, बरें तर नको देऊं. मग ते दोघे कांहींसे पुढें गेले, इतक्यांत बटवीचा धनी शोध लावून सरकारचे शिपाई घेऊन पाठीमागें त्यांस गाठीत आला. त्यांस पाहून बटवीवाला सोबत्यास ह्मणतो, गड्या, आपण गोष्ट वाईट केली. त्यास सोबती उत्तर करितो, आतां आपण गोष्ट वाईट केली, असें कां ह्मणतोस? म्यां गोष्ट वाईट केली असें ह्मण; जर तूं मला तुझ्या सुखाचा वांटा देतास, तर मीही तुझ्या दुःखाचा विभागी होतों.

### तात्पर्य.

जो पुरुष इच्छीत असेल कीं, आपल्या संकटसमयीं दुसऱ्यानें आपणास उपयोगीं पडावें; त्यानें मित्र जोडून ठेवावे. ते मित्र जोडण्याची रीति अशी आहे कीं, मुळीं आपण त्यांस उपयोगी पडावें; त्यांशीं मन मोकळें ठेवावें, कृपणपणा करूं नये. असें झालें तरच ते आपल्या संकटकाळीं उपयोगीं पडतील.

---

## गोष्ट ४८.

### दोन वाटसरू आणि आस्वल.

दोन पुरुष देशांतरीं जावयास निघाले, त्यांनीं परस्पर आणभाक केली कीं, वाटेंत जड अवघड आलें तर एकमेकांस सोडूं

नये. पुढें ते एका अरण्यांतून जात असतां एक आस्वल त्यांच्या आंगावर धांवून आला; त्यासमयीं त्यांतील एकजण, पातळांगी चपळ होता, तो झटकर पळून झाडावर चढला. दुसरा भारी आंगाचा होता, त्याच्यानें पळवेना; तेव्हां तो आपला श्वास कोंडून भुईवर निश्चेष्ट निजला. आस्वलानें त्याजवळ येऊन त्याच्या कानाशीं हुंगून पाहिलें, आणि हें मढें आहे असें समजून, कांहीं उपद्रव न करितां तो माघारा गेला. आस्वल गेल्यावर, झाडावरचा वाटसरू खालीं उतरून दुसऱ्यास हंसत हंसत पुसतो, मित्रा, तो आस्वल तुला काय बोलला ! कांकीं मी झाडावरून पाहात होतों कीं, तो तुझ्या कानाशीं लागून कांहीं सांगत होता. त्यानें उत्तर केलें कीं, आस्वलानें मला सांगितलें कीं, तुझ्यासारिख्या लुच्याच्या वचनावर अतःपर विश्वास ठेवूं नये.

## तात्पर्य.

आपणास अगत्य नसतें तेव्हां लोक पुष्कळ ममता दाखवितात, आणि भरवशाचीं बोलणीं बोलतात; परंतु त्यांत अडचणीच्या वेळेस कामास पडणार असा सांपडावयाचा फार कठीण आहे. लोकरीति जो जाणतो तो पुरुष असल्या भाषणावर भरवसा ठेवीत नाहीं. नुसतें बोलणें बोलणाऱ्यानें बोलूं नये, आणि ऐकणाऱ्यानेंही त्यावर विश्वासूं नये; त्यांत उभयतांचाही तोटा आहे.

---

## गोष्ट ४९.

### धनगर जो व्यापारी झाला होता.

एक धनगर एके दिवशीं समुद्राच्या कांठीं मेंढ्या चारणीस

लावून, आपण एका धोंडीवर शीतळ आणि मंदवारा खात बसला होता. त्या समयीं निवात होतें; त्यामुळें समुद्राचें पाणी शांत होतें तें पाहून त्यास संतोष होऊन इच्छा उत्पन्न झाली कीं, आपण व्यापारी व्हावें. तो ह्मणाला, अहो, जो मी मेंढ्या चारीत एथें रिकामा बसतों तोएक धडशी नौका विकत घेऊन जर समुद्रांत गेलों तर किती सुखीहोईन! दूरदेशीं माल नेला असतां मला किती लाभ होईल! धन आणि थोरवी मिळवावयास ही वाट किती सुलभ आहे! अशा कल्पना करून, जाऊन, त्याने आपल्या सर्व मेंढ्या बाजारांत विकल्या, दुसरेंही होतें नव्हतें तें सर्व विकून त्याची एक नौका विकत घेतली, तींत माल व नावाडी मनुष्यें घेऊन हाकारून अंमळ दूर गेला, तों वादळास आरंभ झाला; मोठमोठ्या लाटा उचलूं लागल्या; दिशा खायास येऊं लागल्या; तारूं बुडूं लागलें. मग भार हलका करावा ह्मणून त्याने आंतील माल सगळा पाण्यांत टाकिला. तें करितांच, तारूं वाऱ्याने हांटलें तें एका खडकावर आपटून त्याचे तुकडे तुकडे झाले; नावाडी सर्व बुडाले; तो मात्र बुडतां बुडतां मोठ्या संकटाने तडीस लागला. नंतर पूर्वी ज्यास मेंढ्या विकल्या होत्या त्याजवळ तो चाकरीस राहावयास गेला; त्याने त्यास त्याच मेंढ्या राखावयास ठेविलें; तेव्हां पुन्हा एके दिवशीं तो समुद्रकांठीं धोंडीवर बसला आहे, तों समुद्रास निश्चळ पाहून ह्मणतो, अरे ठका, आतां तूं मला दुसऱ्याने लालचावयास पाहतोस, पण तो तुझा प्रयत्न व्यर्थ आहे. रे, म्या तुला पाहून पुन्हा भुलावें, तर मी सध्यां फार दरिद्री आहें, आणि एकवेळ अनुभव घेतला त्याने मला शहाणें केलें, ह्मणून मी आतां तुझा विश्वास धरणार नाहीं.

### तात्पर्य.

विकतें शहाणपण चांगलें, अशी ह्मण आहे. ह्यासाठीं जो पुरुष एकदां स्वयें दुःख कष्ट सोसून वस्तूचा अनुभव घेऊन थंड झाला, तो मग आपल्या अवस्थेंत संतुष्ट राहतो, तीहून अन्य इच्छीत नाहीं.

---

## गोष्ट ५०.

## धनगराचा पोर.

एका धनगराचा पोर मेंढरें राखीत असतां, लांडगा आला, रे, लांडगा आला, ह्मणून विनोदाने वेळोवेळीं ओरडत असे. तें ऐकून जवळच्या शेतांतून कुणबी धावून येत, आणि पहात तों तेथें लांडगा नाहीं. असें दोनचार वेळां ते फसले, तेव्हां त्यांनी निश्चय केला कीं, पोर लबाड आहे; ह्याची हाक पुन्हा मनास आणूनये. मग एके दिवशीं लांडगा खराच आला, त्यासमयीं घाबरून तो पोर हाका मारूं लागला; तेव्हां पहिल्याप्रमाणें हीही लबाडी असेल असें समजून कोणी धांवून गेला नाहीं; मग त्याचीं तीं मेंढरें लांडग्याने सावकाश मारिलीं.

### तात्पर्य.

जो पुरुष लबाड असा एकवेळ प्रसिद्ध झाला, त्याच्या बोलण्यावर मग लोक विश्वास ठेवीत नाहींत. तो खराही संकटांत आहे, तरी त्याची गोष्ट खोटी मानून त्यास साहित्य करीत नाहींत.

---

## गोष्ट ५१.

## पंतोजी आणि मुलगा.

कोणी एका शाळेंतला मुलगा, पारंग्याचीं वाहिलें कमरेस

बांधून, नदींत पोंहावयास शिकत असे; एके दिवशीं त्यास वाटलें कीं, आपणास पोहतां आलें, आतां ह्या लांकडांचें काय प्रयोजन आहे ? ह्मणून त्यानें तीं लांकडें कांठीं ठेवून नदींत उडी घातली. तो ओघाच्या लोटानें ओंड पाण्यांत गेला; आणि गचकळ्या खाऊं लागला. दैवयोगानें एक वृक्षाची डाहाळी नदींत झोंकावली होती, तेथें तो लोटत गेला; तेव्हां तीस गच्च धरून बुडतों रे, बुडतों, ह्मणून हाका मारितो आहे, अशासमयीं त्याचा पंतोजी नदीच्या कांठीं सहज गेला होता त्याच्या कानीं ते करुणा शब्द पडले; तो पुढें जाऊन पाहतो तों मुलगा संकटांत दृष्टीस पडला. तेव्हां तीं लांकडें त्यानें मुलाकडे फेंकलीं. त्यांस धरून तो कांठीं आला; त्यासमयीं पंतोजीनें त्यास हा उपदेश केला. अरे मुला, अजून पुढें तुला ही संसार महानदी तरून जायाचें आहे; तूं स्वतंत्रपणें वागायास अद्यापि प्रौढ नाहींस; ह्यासाठीं तुजहून वडील आहेत त्यांचीं वचनें नदींत तरायाच्या लांकडासारिखीं मानून, त्यांचा तूं आदर कर.

## तात्पर्य.

कितीएक पुरुष असे अभिमानी असतात कीं, ते सहस्त्र अडचणी सोशितील, परंतु दुसऱ्याची बुद्धि घ्यावी असें त्यांस वाटणार नाहीं. ह्या संसारसागरामध्यें राहाणें फार कठीण आहे; एथें असा कोणी पुरुष आढळत नाहीं कीं, ज्यास दुसऱ्याचें साहित्य नको. त्यामध्येंही जे तरुण आहेत, जांस सृष्टीची रीत अजून पक्की समजली नाहीं, त्यांनी तर स्वबुद्धीनें चालूंच नये

## गोष्ट ५२.

### पशमी कुतरा आणि शिकारी कुतरा.

एक सालस पशमी कुतरा वाटेने चालत असतां त्याच वाटेवर एक दुष्ट कुरठा शिकारी कुतरा चालला होता. त्यास त्याने गांठून घेतलें. ह्या पशमी कुतऱ्याची व शिकारी कुतऱ्याची ओळख नव्हती; तरी ह्या कुतऱ्यानें त्यास हाटकून प्रश्न केला, दादा, तुमची आमची वाट एकच आहे; तर आपण संगती सोबतीने जाऊं ! शिकारी कुतरा स्वभावाने द्वाड होता, तरी त्यावेळेस त्याची वृत्ति कांहींशी थंड होती, ह्मणून त्याने मान्य केल्यावरून दोघे बरोबर चालले. पुढे जातां जातां ते एके गांवांत शिरले. त्या गांवांत पुष्कळ कुतरीं होतीं, तीं पाहून द्वाड शिकारी कुतरा ज्यावर त्यावर भोंकून तोंड टाकूं लागला; तेव्हां आपल्या कुतऱ्यांचें संरक्षण करण्यासाठीं गांवकरी हातांत काठ्या घेऊन निघाले, आणि आपल्या कुतऱ्यांशीं कोणता कुतरा भांडतो, हा विचार नकरितां त्यांनी ह्या दोहों कुतऱ्यांसही काठ्यांखालीं बडविलें.

### तात्पर्य.

संगत करणें तर विचार करून करावी, कारण कीं, भलत्याने जर दुष्टाची संगत धरली तर दुष्टाबराबर त्यासही दुःख भोगावें लागतें.

---

## गोष्ट ५३.

### पशु, पक्षी, आणि वाघूळ.

एकेसमयीं पशु पक्षी आणि वाघुळ ह्यांच्यामध्यें मोठें दारुण

युद्ध होऊं लागलें; तेव्हां वाघुळाने विचार केला कीं, आपल्या शरीराच्या घडणीवरून आपण पक्षी कीं, पशु ह्याचा लोकांत संदेह आहे, तो आज आपल्या पथ्यावर पडेल. तर आपण वेगळें राहून काय होतें तें आधीं पाहूंया; मग पाहिजे तो पक्ष धरतां येईल. इतक्यांत दोन्ही दळें समरांगणीं एकवटून मोठीच हाणामार चालली. ती पाहून पहिल्यानें वाघुळास असें वाटलें कीं, पक्ष्यांची जीत होईल; ह्मणून तो त्यांच्या मंडळीकडे आला; आणि दुरून टैंकारून लक्षांत होता कीं, अधिक उणें झालें तर तशीच वर्तणूक करावी. मग कांहींका वेळाने पशूंचें सैन्य जय पावलेंसें त्यास दिसलें; तेव्हां तो त्यांजकडे जाऊन त्यांस भासवूं लागला कीं, उंदिराच्या तोंडास आणि माझ्या तोंडास कांहीं मिळतें, ह्मणून मी पक्षी नव्हे, पशु आहें; मला आपल्या मंडळींत घ्या, मी सदा तुमचें कल्याण हृदयांत वागवीन, आणि तुह्मांशीं कधींही विपरीत होणार नाहीं. पशूंनी तें मान्य केलें. शेवटीं गरुडाने मोठा पराक्रम करून पशूंचा सर्वथा मोड केला. त्यासमयीं तें वाघूळ आपला प्राण वांचावा, आणि ज्ञातीच्या हातीं लागून आपली अप्रतिष्ठा होऊंनये, ह्मणून तेथून पळालें; तें तेव्हांपासून झाडाच्या ढोलींत, व गिरिकंदरांत, शिरकून राहिलें आहे. तें अद्यापि, रात्र पडल्ये आणि सर्व पक्षी आपआपल्या स्थळीं निजायास जातात, तेव्हां मात्र बाहेर पडत असतें.

## तात्पर्य.

कोणता तरी एक पक्ष दृढ न धरितां दोहींकडचा पक्षपात दाखवून धर सोड करणें हें नीच कर्म होय. केवळ स्वहितावर दृष्टि

देऊन जे दोहों दगडांवर हात ठेवितात ते शेवटीं फसतात. जे दोहों पक्षांशीं प्रतारणा करितात त्यांची ती उघाडीस आली असतां ते जिवास मुकतात; कदाचित् वांचले तर त्यांस सृष्टींत तोंड दाखवावयास जागा नाहीं असें होतें. ते दुष्ट जिकडे जातात तिकडे लोक त्यांचा कंटाळा करतात.

---

## गोष्ट ५४.

## पक्षपाती न्यायाधीश.

एका न्यायाधीशाच्या शेजारीं एक शेतकरी कुणबी राहात होता. तो एके दिवशीं न्यायाधीशाकडे जाऊन त्यास ह्मणतो, महाराज, एक वाईट गोष्टीचें वर्तमान मी आपणांस सांगावयास आलों आहें. माझ्या मारक्या बैलाने आपलें गुरूं शिंगाने हुंदाडून फार दुखविलें आहे. हें नुकसान भरून देण्याविषयीं आपली आज्ञा काय आहे? हें कुणब्याचें बोलणें ऐकून न्यायाधीश ह्मणतो, गड्या, तूं फार सचवटीचा मनुष्य आहेस; आपला अपराध मजकडे सांगावयास आलास, त्या पक्षीं माझें दुखवलेलें गुरूं घेऊन त्याच्या बदला तुझें चांगलें गुरूं त्वां मला द्यावें, ही तुला नीति वाटेलच. शेतकरी ह्मणतो, गोष्ट वाजवीच आहे; आपण न्यायच सांगतां, पण मी बोलतांना चुकलों. माझ्या बैलाने आपल्या गुरास हुंदाडलें नाहीं, तर आपल्या बैलाने माझ्या गुरास हुंदाडलें आहे. न्यायाधीश ह्मणतो, असें आहे काय? तर ही गोष्ट वेगळी, मी चौकशी करीन, आणि जरकरितां, इतक्यांत शेतकरी ह्मणतो, काय, जरकरितां ह्मणतां? माझ्या बैलाने तुमच्या गुरास हुंदाडलें तेव्हां जरकरितां नि-

घातलें नव्हतें; आणि तुमच्या बैलानें माझ्या गुरास हुंदाडलें तेव्हां जरकरितां आलें; ह्यावरून मला समजलें कीं आपली न्यायाची रीति पक्षपाताची आहे.

### तात्पर्य.

आपण दुसऱ्यावर जे अपकार करितों ते, आणि आपणावर जे दुसरे करतात ते, आपण एका मापानें मोजून पाहात नाहीं; त्यांत भेद ठेवितों; ही गोष्ट न्यायाची नव्हे. तर दुसऱ्याला भरून देणें आणि दुसऱ्यापासून भरून घेणें हीं दोन्हीं कामें एकाच मापानें मोजलीं पाहिजेत.

---

## गोष्ट ५५.

## पारवा आणि कोंबडे.

कोणी एका माणसानें एक पारवा धरिला; त्याच्या पांखांतील कांहीं पिसें उपटून, जांत कोंबडे टेविले होते त्या कुपणांत तो सोडिला; तेव्हां तेथें कोंबड्यांनी त्यास क्षणक्षणां टोंचीत असावें, आणि चाऱ्यावरून हाकून द्यावें. असे त्यानें किती एक दिवस फार क्लेशानें काढून आपल्या मनाची समजूत केली कीं, आपल्या घरीं आलेल्या पाहुण्याचा समाचार न घेतां उलटी त्यास पीडा करितात, तस्मात् हे भले नव्हत; मोठे निर्दय शठ आहेत. पुढें त्यानें असें पाहिलें कीं, ते कोंबडे दहा पांचवेळ आपआपणांत भांडून एकमेकांस मारूं लागले; तेव्हां त्यानें असा विचार करून आपलें समाधान केलें, अरे, जे हे आपल्या जातीस उपद्रव करावयास चुकत नाहींत ते मला परक्याला पीडा करतात ह्यांत काय आश्चर्य.

### तात्पर्य.

जे लोक आपल्या जातींत कलह करून एकमेकांस उपद्रव करितात, त्यांनी परक्या जातीच्यांचा द्वेष केल्यास त्याने खिन्न होऊं नये.

---

## गोष्ट ५६.

### पोट आणि अवयव.

एकेसमयीं रूम नामक शहरांत असें झालें कीं, वारंवार युद्धप्रसंग पडल्यामुळें सरकारास द्रव्याची अडचण झाली ह्मणून प्रजेवर सरकार देण्याचें ओझें अधिक पडलें. ह्या गोष्टीला कंटाळून, सरकारास पट्टीचा पैसा देऊं नये, असा सर्व प्रजांनी निश्चय केला. त्यासमयीं सरकाराने मेनेन्यस् अग्रिप्पा नांवें कोणी कारभारी होता त्यास त्या लोकांची समजूत करण्याकरितां पाठविलें. त्याने ही पुढील गोष्ट त्यांस सांगून त्यांचा वेडेपणा त्यांचे पदरीं घातला, आणि त्यांस वाटेवर आणिलें. तो ह्मणाला, गड्यांनो, माझी गोष्ट ऐका! कोणेका काळीं हातपाय इत्यादि अवयव हे पोटाने कांहीं केलेल्या कामावर रुसून विचार करिते झाले कीं, आह्मीं मोठा श्रम करून मिळवावें, आणि ह्या पोटाने रिकामें बसून खावें, हें ठीक नाहीं. जिभेने मोठे युक्तीने अवयवांचीं दुःखें तिखट मीठ लावून बनावून वर्णिलीं. ती ह्मणाली, रे, हे हात पाय खपून, श्रम कष्ट भोगून, जें मिळवितात तें सारें ह्या पोटाकडे जातें. हें पोट कांहींच काम करीत नाहीं; व ह्यापासून आह्मांला कांहींच लाभ नाहीं; असें असतां, आह्मींच सर्वदा ह्याची भर करावी, हा मोठा आह्मावर जुलूम आहे. हें भा-

पण ऐकून सर्व अवयवांनी वाहवा केली. हात लागलेच ह्मणाले, इतःपर पोटाकरितां आह्मी कोणत्याही कामास बोट लावणार नाहीं; पाय ह्मणाले, ह्या पोटाचें ओझें आजपर्यंत आह्मी वाहात आलों तें आतां वाहणार नाहीं; दांत ह्मणाले, त्याच्याकरितां पुढें आह्मीं एक दाणाही चावणार नाहीं. हें त्यांचें बोलणें ऐकून पोट ह्मणालें, बाबानों, तुह्मी हें वेडेपण करूं नका! जें करणें तें विचारपूर्वक करा! तुह्मी मला जें काय आणून देतां तें मीच मात्र भोगितों असें नाहीं. तुमच्या सर्वांच्या पोषणासाठीं मी जिकडे तिकडे तें वांटून देतों. अशी त्याने जी समजूत केली ती फुकट गेली. कांतर कामक्रोधादिकांचे आवेशांपुढें बुद्धीचें कांहीं चालत नाहीं. शेवटीं, अवयवांकडून पोटास कांहीं मिळेनासें झाल्यामुळें पोट अगदीं शुष्क होऊन अस्थि पंजर मात्र उरला. मग पोटाकडून अवयवांचें पोषण न घडल्यामुळें तेही अशक्त झाले. अशी जेव्हां त्यांची अवस्था झाली, तेव्हां त्यांस पश्चात्ताप होऊन पूर्ववत् पोटाकरितां आपापलीं कामें करण्यास राजी झाले. परंतु कांहीं उपाय राहिला नाहीं. ह्या अविचारामुळें शेवटीं मरण येऊन सर्व शरीराचा नाश झाला.

## तात्पर्य.

प्रजेने सरकारास पट्टीचा पैसा देण्याविषयीं अनमान करावा हें मोठें वेडेपण होय. प्रजेने सरकारास पैसा जर न दिला, तर राजापासून प्रजेचें संरक्षण कसें होईल! पुंडावीं माजतील; चोर दिवसा दरवडे घालतील; कोणी कोणाचें ऐकणार नाहीं; असें होऊन राजा आणि प्रजा ह्यांचा एकदांच नाश होईल.

## गोष्ट ५७.

## बहीण आणि भाऊ.

एका पुरुषास दोन लहान मुलें होतीं. एक मुलगी आणि एक मुलगा. मुलगा होता तो रूपानें फार सुंदर होता; मुलगी रूपानें साधारण होती. एके दिवशीं तीं दोन्ही मुलें आरशापाशीं खेळत असतां, मुलगा मुलगीस ह्मणतो, अगे, ह्या आरशांत पाहूं बरें सुंदर कोण दिसतें तें? मुलगीस तें वाईट वाटलें. तिला समजलें कीं, त्यानें मला हिणवायासाठीं ह्मटलें. मग तिनें बापाजवळ जाऊन भावाचें गाऱ्हाणें केलें; आणि ह्मणाली, बाबा, आरशांत रूप पाहून समाधान पावणें हा बायकांचा विषय होय; त्यांत चित्त घालणें हें पुरुषास योग्य नाहीं. बापानें दोघांसही आलिंगून त्यांचें समाधान केलें. तो ह्मणाला, मुलांनो, तुह्मी भांडूं नका. अतःपर तुह्मी दोघेंही नित्य आरशांत पाहात जा; मुला, तूं ह्याकरितां पाहा कीं तुझ्या ह्या अशा सुंदर तोंडास दुर्गुणाचा मळ लागला तर तुला समजेल; आणि मुली, तूं ह्याकारितां पाहा, कीं तुझ्या रूपांत जें उणें आहे तें तुझ्या गुणांनी पुरतें झालें कीं नाहीं हें तुला समजेल.

### तात्पर्य.

ह्या सृष्टींत अशी कांहीं वस्तु नाहीं कीं, विचाराच्या अंगीं जींत कांहीं उणें दिसत नाहीं. ह्यासाठीं बुद्धिरूप आरसा करून त्यांत आपले गुण अवगुण नित्य पाहात गेलें असतां मोठें हित आहे. हें आबालवृद्धांनीही करावयास योग्य आहे. जो रांतीचा पुरुष आहे, त्यास आपले अवयव आरशांत सुंदर दिसोत;

परंतु त्याने विचार करून पाहावें कीं, जसा मी बाहेरून नीट ब-नलों आहें, तसा आंत आहें कीं नाहीं? रूपाने फार सुंदर आ-हे, परंतु आंतले गुण वाईट आहेत, तर तो पुरुष लोकांस अप्रिय होतो, तोच जर मधुरभाषण, उत्तम स्वभाव, आदिकरून गुणांनीं युक्त आहे तर लोकांस फारच आवडतो. सुरूप पुरुषास चांग-ले गुण नसले, तर तो उपयोगीं नाहीं; परंतु जो चांगल्या गुणा-चा पुरुष आहे; त्याचें रूप कसेंही असो, तिकडे लोक लक्ष देत नाहींत. खोट्या मण्यास चमक फार असत्ये, परंतु तो काय ख-ऱ्या रत्नाचीं बरोबरी करील? तें बाहेरून बेडौल आहे; तरी हाडीं रत्नच कीं? तसा; जो आंत चांगला, ज्याची बुद्धि स्वच्छ, करणें चोख, मन सरळ, जो शाहाणा, त्यास रूपाचें प्रयोजन नाहीं.

---

## गोष्ट ५८.

## बेडूक आणि दोन बैल.

दोन बैल एका तळ्याच्या वरल्या कडेस भांडत होते, तें त-ळ्यांतील बेडकांनीं पाहिलें; मग तो दुसऱ्या बेडकांस ह्मणतो, रे पाहा! पाहा! तें समोर काय होत आहे तें; हायहाय, आतां आप-ली गत कशी होईल? दुसरा ह्मणतो, रे, तूं इतका कां त्यांला भ्याला आहेस? त्यांच्या भांडणाशीं आणि आपणाशीं संबंध काय? त्यांचीं जात वेगळी, रीत वेगळी, भक्ष्य वेगळें, ते आह्मांस उपद्रव कराव यासाठीं भांडत नाहींत; तर, एकाने दुसऱ्यास पिटून लावावें, आणि आपण कळपाचा स्वामी व्हावें, ह्मणून भांडत आहेत; असें असतां, आपण आपल्याठायीं मूर्खासारिखें उगीच भ्यावें, हें चांगलें नव्हे. त्यास पाहिला ह्मणतो, रे, तें खरें, परंतु आतां असें होईल कीं त्या

दोघांतून एक हरेल, तो पळून ह्या तळ्यांत येईल, तेव्हां आपल्या मंडळींतून कित्येक त्याच्या पायांखालीं सांपडतील; तर ह्यावरून तूं पाहावें कीं त्यांच्या भांडणाशीं आणि आपणांशीं किती जवळचा संबंध आहे तो.

## तात्पर्य.

थोर थोरांच्या भांडणांत जवळचीं गरिबें सहज चुरडतात. मग जे थोरांचा पक्ष धरून पुढें होतात त्यांचा नाश होतो, हें काय सांगावें ! ज्यांत सर्वांचें कल्याण होत आहे, असल्या एकाद्या गोष्टींत मोठ्या बरोबर लहानांनीं लागावें; परंतु केवळ लोकांच्या कल्याणासाठीं उद्योग करणारे मोठे विरळा असतात; जे बहुतांच्या कल्याणाचें निमित्त करून भांडण उचलतात त्यांचें लक्ष फार करून स्वार्थ साधण्याकडे असतें, ते लोकांकरितां भांडत नाहींत; तर, आपल्या हातीं राजसत्ता यावी, आपण राजभोग भोगावे, आपल्या आज्ञेखालीं सर्वांनी राहावें, ह्मणून भांडत असतात; मग ते अधिकारावर स्थिर झाले, ह्मणजे प्रजेस पीडा करण्यास आरंभ करितात; ह्यास्तव, असे जे भांडणारे त्यांपासून शहाण्यांनी दूर असावें; सामर्थ्य चालल्यास दोन्ही भांडत्या पक्षांस समयीं हाणून पाडावें, आणि लोकांची पीडा दूर करावी.

---

## गोष्ट ५९.

## बैल आणि बेडूक.

एक बैल एका कुरणांत चरत होता, तेथें लहान लहान बेडूक खेळत होते. त्यांतील एक बेडूक बैलाच्या पायांखालीं चेपून

मरण पावला. तें वर्तमान दुसऱ्या बेडकांनीं घरीं जाऊन आपल्या आईस सांगितलें. ते ह्मणाले, आई, इतका मोठा प्राणी आह्मीकधींही पाहिला नव्हता. हें ऐकून बेडकीण आपलें पोट पुष्कळ फुगवून त्यांस पुसत्ये, काय, तो इतका मोठा आहे ? ते ह्मणाले, आई, ह्याहून अतिशय मोठा आहे. पुन्हाअंमळ अधिक पोट फुगवून ती बोलत्ये, इतका आहे ! ते ह्मणाले, आई, तूं पोट फुटेपर्यंत फुगलीस, तरी त्याच्या बरोबरीस पावणार नाहींस, तें ऐकून गर्वानें ती आणखीही फुगूं लागली असतां पोट फुटून मृत्यु पावली.

### तात्पर्य.

डामडौलाविषयीं श्रीमंताची बरोबरी करावयास गरीबानें इच्छूं नये. इच्छिल्यास बेडकिणीसारिखा नाश पावेल.

---

## गोष्ट ६०.

### बैल आणि बोकड.

सिंह मागें लागला ह्मणून एक बैल जीव घेऊन पळाला. तो एका गुहेंत शिरूं लागला. तेथें एक बोकड होता, तो त्यास आंत येऊं देईना. तो ह्मणूं लागला कीं हें माझें घर; ह्यांत तूं आलास तर तुला मारीन. बैलानें बहुत काकुळत केली कीं, अरे, माझ्यापाठीस सिंह लागला आहे; ह्यासमयीं तुझ्या गृहस्थपणास योग्य आहे कीं मला असरा द्यावा. बकरा तें कांहीं ऐकेना, शिंगें समोर करून आंगावरच येऊं लागला. तेव्हां बैल त्यास ह्मणतो, रे, मी तुला अथवा तुझ्या शिंगांस भीत नाहीं. काय करूं! जर कां ह्या वेळेस माझ्या पाठीवर सिंह नसता, तर बैलाच्या आणि बोकडाच्या

योग्यतेमध्यें किती अंतर आहे, ह्याचा चमत्कार तुला आतांच दाख विला असता.

## तात्पर्य.

कोणीही संकटामध्यें असतां त्यास साहित्य नकरणें, हें मनुष्यपणास अयोग्य. मग साहित्य न करून त्यास धिक्कारणें, अथवा उपद्रव करणें, किंवा त्याच्या दुःखावर डाग देणें, ह्यासारिखा पाजीपणा दुसरा काय आहे.

---

## गोष्ट ६१.

## बोका ज्यास कोणी जेवावयास बोलाविलें होतें.

एका गृहस्थाने एका थोर मनुष्यास जेवावयास बोलाविलें होतें; त्यासाठीं मोठा समारंभ चालला होता. तें घरच्या बोक्याने पाहून, मनांत विचार केला कीं, मी फार दिवस माझ्या मित्रास जेवावयास बोलाविणार, त्यास आजची ही सवड बरी आहे. मग त्यानेही आपल्याइष्टास आमंत्रण दिलें; त्यावरून तो तेथें आला, आणि प्रथम पाकशाळेंत गेला. तेथें नानाप्रकारचे पदार्थ शिजत होते, ते पाहून मनांत ह्मणतो, हें अन्न एरवीं मला दुर्लभ, परंतु इष्टाच्यायोगाने आज प्राप्त झालें आहे; तर आतां मी हें असें खाईन कीं, आठ दिवसांची निश्चिती. असा मनोरथ करून शेपटी हालवितो आहे, आणि लाळ घोटितो आहे, इतक्यांत त्यास एका रांधप्याने पाहिलें आणि हळूच त्याच्या पाठीमागून येऊन, त्याच्या मागील दोन तंगड्या धरून, त्यास खिडकी बाहेर झोकून दिलें; तेथें खालीं दगड होते त्यांजवर आदळून बोक्याचें सर्वांग ठेंचलें. तो ओरडत ओरडत

गलींतून पळूं लागला; तें पाहून दुसरीं मांजरें त्याजवळ आलीं; त्यांनीं त्यास विचारिलें अहो, आपणास मेजवानीस बोलाविलें होतें. तेथचा काय समाचार आहे? तो ह्मणाला, तो समाचार काय वर्णूं! अशी मेजवानी जन्मांत मला झालीच नव्हती! पण झालें काय कीं, अंमळ कुसुंबा विशेष झाला, त्याचा अंमल चढून त्या घरांतून मी बाहेर कसा निघून आलों, ह्याची शुद्धि मला राहिली नाहीं.

### तात्पर्य.

मुख्य यजमानाची ओळख असल्यावांचून आणि त्याने बोलाविल्यावांचून, नुसतें लग्याच्या विश्वासावर कोठें जाणें, तें बोक्यास झालें तसें खेदास कारण होतें. तेथें अप्रतिष्ठा होत्ये ती मग मोठ्या युक्तीनें छपवावी लागत्ये.

---

## गोष्ट ६२.

### मनुष्य ज्यास कुतरा डसला होता.

एका मनुष्यास कुतरा डसला. त्यास एका ह्यातारीने उपाय सांगितला कीं, भाकरीचा तुकडा घेऊन घायावर लावः मग तो तुकडा त्या कुतऱ्याकडून खाववाव ह्मणजे विष उतरेल. तो मनुष्य त्याप्रमाणें करितो आहे, इतक्यांत एक शहाणा मनुष्य त्या वाटेने जात होता त्याने त्यास पुसलें, अरे, हें तूं काय करितोस ? तेव्हां घायाळानें कचें वर्तमान सांगितलें तें ऐकून शहाणा ह्मणतो, रेरे, जर असें आहे तर मीं तुजपाशीं मागून घेतों कीं, हें तूं फार चोरून कर. जरकां हें वर्तमान ह्या शहरच्या कुतऱ्यांस समजलें, तर तीं एक मनुष्य जखमेवांचून राहूं देणार नाहींत.

### तात्पर्य.

अपराध्यांस पारिपत्यच योग्य; तें न करून जो पुरुष त्यांस भिऊन त्यांची उलटी खुशामत करितो, त्यानें ती गुप्त तरी करावी; नाहींतर भल्यांची शोभा जाईल, आणि दुष्टांचें माहात्म्य वाढेल.

---

## गोष्ट ६३.

### मनुष्य आणि सिंह.

एके रानकऱ्याची एके दिवशीं सिंहाशीं गांठ पडली असतां, फारवेळ उभयतांचें बोलणें झालें. तें एकाचें एकास बहुतकरून मानतच गेलें. शेवटीं मनुष्य श्रेष्ठ कीं, सिंह श्रेष्ठ, ह्यावर गोष्ट निघाली; तेव्हां दोघे भांडूं लागले. मनुष्यास आपलें बोलणें प्रतिपादावयास कांहीं सुचेना. तेव्हां त्यानें त्याच ठिकाणीं सिंहास दोन बाहुलीं दाखविलीं. तीं एका संगमरवरी दगडाच्या चवथऱ्यावर बसविलीं होतीं, आणि त्यांत असें दर्शविलें होतें कीं, सिंहाच्या केसऱ्या धरून मनुष्य त्यावर स्वार झाला आहे. तें पाहून सिंह बोलला, झालें तुझें साधन; इतकेंचना ! आतां माझें ऐक; तर ज्या पाथरवटानें हीं बाहुलीं केलीं तो मनुष्य होता पाथरवट सिंह जर असता, तर तूं एथें हेंच उलटें पाहतास.

### तात्पर्य.

पक्षपाती आहेत ते आपल्याकडच्या लोकांचीं वचनें, प्रमाणें पुढें करून आपआपला खरेपणा दाखवीत असतात, ह्मणून पक्ष प्रतिपक्ष दोनही ऐकिल्यावांचून कोणत्याही गोष्टीचा सिद्धांत करूं नये.

---

## गोष्ट ६४.

## मनुष्य आणि हंसी.

कोणा एका मनुष्यापाशीं एक हंसी होती. ती नित्य एक एक सोन्याचें आंडें घालीत असे. तें घेऊन त्यामनुष्याची आशा उणी व्हावी, ती अधिक वाढत चालली; आणि त्यास वाटलें कीं, जेथून अशीं आंडीं निघतात तें ठिकाण हातीं लागलें असतां, अपार धन एकदांच प्राप्त होईल; मग त्यानें त्या हंसीचें पोट चिरिलें; आणि तो पाहूं लागला तों आंत कांहींच सांपडलें नाहीं; परंतु तो मोठा पश्चात्ताप मात्र पावला.

### तात्पर्य.

ईश्वर ज्यास त्यास भोगापुरतें यथास्थित देतो, त्याला धन संग्रह करणें झालें तर त्यांतच हात राखून करावा; हें न करून जो अतिलोभ धरितो आणि एकदांच श्रीमंत व्हावें ह्मणून एकाद्या मोठ्या कारस्छानास हात घालितो, त्याचा उद्योग निष्फळ होऊन मुळचें असतें तेंही जातें.

---

## गोष्ट ६५.

## मांजर आणि उंदीर.

एका घरांत उंदीर फार झाले होते, तेथें एक मांजर आलें, त्याने त्यांतील कांहीं खाऊन उंदीर उणे केले, तें पाहून एकेदिवशीं शेष राहिलेल्यांनीं एकत्र होऊन निश्चय केला कीं, वरून खालीं कोणी उतरूं नये. त्या दिवसापासून मांजराच्या हातीं उंदीर लागले नाहींत. तेव्हां मांजर उपाशीं मरूं लागलें असतां, त्याने एका खुंटीस आ-

पले पाय अडकवून मेल्याचें सोंग घेतलें. तें पाहून वरून एक म्हातारा उंदीर त्यास म्हणतो, गड्या, तूं खुशाल टांगून घे ! हें तर काय ! परंतु तुझें पोट चिरून आंत पेंढा भरला आहे असें जरी तुला आम्हीं पाहिलें, तरी इतःपर आम्ही तुझा विश्वास धरणार नाहीं.

**तात्पर्य.**

घातकी, कपटी, ठक, ह्यांचीं गोड वचनें व कर्मे लोक खरीं मानितात, म्हणूनच ते फसतात. एकवेळ त्यांचें स्वरूप ज्यांनीं ओळखिलें, आणि ते लुचे असा ज्यांनीं मनांत दृढ निश्चय केला, त्यांस त्या दुष्टांनीं काय ठकवावयाचें आहे.

---

## गोष्ट ६६.

## मुरकुट आणि बैल.

एक मुरकुट, आपण कोणी मोठा प्राणी आहों, अशा अभिमानाने फुगून एका बैलाच्या शिंगावर बसलें आणि बैलास म्हणूं लागलें, दादा, मी तुमच्या शिंगावर बसलों येणेंकरून तुम्हांस अडचण झाली असेल, असें मला वाटतें; पण मला बसलें पाहिजे. तर कृपाकरून आपण मला रागें भरूंनये, जर तुम्हांस माझा भार फार वाटूं लागला, तर मला सांगा, म्हणजे मी उडून जाईन. बैलाने उत्तर केलें रे, गड्या, तूं बसलास तेव्हां मला समजलें नाहीं, आणि तूं उडून जाशील तेव्हांही मला समजाणार नाहीं.

**तात्पर्य.**

थोडा बहुत अभिमान सर्वांस असतोच. कित्ती एकांस अभिमान इतका विशेष असतो कीं, आपली योग्यता केवढी, दुसऱ्याची

केवढी व आपले आंगीं गुण किती व दुसऱ्याचे आंगीं किती. हें त्यांचे मनांत येतच नाहीं. ह्यास्तव आपल्याने सोडवेल तितका अभिमान सोडून आपली जी वास्तविक योग्यता आहे ती समजून वागावें.

## गोष्ट ६७.

## मुलगा आणि त्याची आई.

एक मुलगा शाळेंत लिहावयास जात असे; त्याने एके दिवशीं एका मुलाची वस्तु चोरिली, आणि ती आपल्या आईजवळ नेऊन दिली. तिने मुलास शिक्षा करावी, ती न करून उलटी तिने त्यास शाबासकी दिली, आणि त्यास एक पेरू खावयास दिला; त्यावरून मग तो मुलगा जसजसा वाढत गेला, तसतसा मोठमोठ्या चोऱ्या करूं लागला. कोणी एके समयीं तो चोरींत सांपडला; मग त्यास फांशीं द्यावयास सरकारच्या शिपायांनीं नेलें, तें कौतुक पाहावयाकरितां लोकांचा थाट मिळाला होता. तेथें त्याची आईही येऊन स्फुंदस्फुंदून रडत होती, तीस पाहून तो सरकारच्या शिपायांस ह्मणतो, दादाहो, एकवेळ ह्या समयीं त्या माझ्या आईची आणि माझी भेट करा. तें ऐकून त्यांस दया आली; आणि त्यांनी तीस जवळ बोलाविलें, त्यावेळीं रागाने त्याने तिच्या कानाचा चावा घेतला. हें पाहून लोक ह्मणूं लागले, कायहो द्वाड हा ! पाहा पाहा ! हा फांशीं जाण्याच्या वेळेसही हें महा पातक करावयास चुकला नाहीं ! तें ऐकून त्याने उत्तर केलें, सज्जनहो, माझी विनंति ऐका. म्यां ह्या आईचा प्राणही ह्यासमयीं जरी घेतला असता, तरी मला दोष लागताना. असें कां ह्मणाल, तर मी मुळीं लहान असतां, शाळेंतील एका मुलाची वस्तु म्यां चोरून हिच्याजवळ

नेऊन दिली होती; तेव्हांच जर हिने माझें पारिपत्य केलें असतें, आणि पेरू दिला नसता, तर आज ही दशा मला कां प्राप्त होती!

### तात्पर्य.

मुलें मूढ होतात, अथवा द्वाड होतात, त्यास बहुत करून आईबापांचे लाड कारण होत. ओल्या मडक्याचा कांठ जसा लवविला तसा लवतो तशीच बालकाची बुद्धि लहानपणीं ज्या मार्गास लाविली तो मार्ग ती सोडित नाहीं. त्यासाठीं, आईबाप, अथवा मुलाचे जे वडील असतील, त्यांनीं तो लहान असतांच त्यास चांगल्या मार्गी लावण्याविषयीं आळस करूं नये; कांकीं मोठा झाल्यावर त्याचा दुर्गुण लक्षावधि रुपये खर्च केल्यानेंही जाणार नाहीं; मग तो जें जें पातक करील त्याचा झाडा देवापाशीं त्याच्या वडिलांस द्यावयाचा पडेल.

---

## गोष्ट ६८.

### मुलगा आणि बदाम.

एपिक्तेतस ह्मणून प्राचीन ग्रीक लोकांत प्रख्यात विद्वान होता; त्याने ही गोष्ट रचिली.

एके घागरींत बदाम भरले होते. त्यांतून कांहीं बदाम घ्यावे ह्मणून एके मुलाने घागरींत हात घातला; आणि जितके बचकेंत घवले तितके बदाम घेऊन, तो हात बाहेर काढूं लागला. तेव्हां घागरीच्या गळ्यापेक्षां बचक मोठी झाली ह्मणून हात बाहेर निघेना. त्यावेळेस त्यास मोठें संकट पडलें कीं, आतां काय करावें, हात मोकळा करावा तर बदाम जातात; बदाम धरावे तर हात निघत नाहीं; ह्मणून तो मोठ्यानें रडूं लागला. तेव्हां जवळ कोणी शहाणा म-

नुष्य होता तो त्यास ह्मणाला, मुला कांहीं बदाम सोडून बचक ल-हान कर ह्मणजे बाकीचे बदाम तुला मिळतील, आणि तुझा हातही बाहेर निघेल.

### तात्पर्य.

आपण कोणत्याही पदार्थाची इच्छा सुमाराची धरली, तरच ती सिद्धीस जाते. जर मोठी इच्छा धरली तर ती कधीं सिद्धीस जात नाहीं.

---

## गोष्ट ६९.

## मुलगे आणि बेडूक.

एका मोठ्या तळ्यांत बेडूक पुष्कळ राहात होते. एकेदिवशीं त्याच तळ्याच्याकांठीं कांहीं मुलगे येऊन भाकरीचा खेळ खेळू लागले. त्यामुलांनीं तळ्यांत खड्यांचा वर्षाव केला, आणि बिचा-ऱ्या बेडकांस मोठें भय घालून त्यांस प्राण संकटांत पाडिलें, शेव-टीं एक बेडूक धैर्य धरून, पाण्यावर येऊन मुलांस ह्मणतो, मुलांनो तुह्मीं आपल्या जातीच्या क्रूर करण्या इतक्या लवकर कां शिक-लां ! हा तुमचा तर खेळ होतो पण आमचा जीव जातो.

### तात्पर्य.

दुसऱ्यास दुःख देऊन, किंवा त्याचें नुकसान करून आपला संतोष करणें, हा मोठा अन्याय आहे.

---

## गोष्ट ७०.

## मृत्यूचें दरबार.

मृत्यू, जो सर्व मनुष्यांवर आपला अंमल चालविणारा त्यास

आपणाला एक प्रधान नेमावयाचा होता ह्मणून त्याने जाहिरनामा लाविला कीं, हें काम जाला पाहिजे त्यानें येऊन अर्ज करावा. ह्यावरून नानाप्रकारचे मोठे मोठे रोग जागा मागावयास आले. पहिल्यानें ताप पुढें होऊन अर्ज करितो कीं, महाराज, तुह्माकरितां मेहनत घेऊन कोट्यावधी माणसें मी मारतों; ह्यास्तव मला अधिकार असावा. वायु कांपत कांपत पुढें सरून ह्मणतो, मी स्वामीसाठीं किती श्रम करतों, हें स्वामीचे लक्षांत आहेच. दमा श्वास टाकीत बोलतो, स्वामीची कृपा व्हावी ह्मणून म्यां आजपर्यंत श्रम करून फार माणसें मारिलीं आहेत. क्षयरोग ह्मणतो, महाराज, मी बहुत मनुष्यें स्वामीचे स्वाधीन करतों, ह्यावरून माझें काम कसें हें स्वामींस ठाऊकच आहे. महामारी ह्मणाली, महाराज ह्यांचें काय ऐकतां? मजसारखी स्वामिकार्य करणारी दुसरी कोण आहे? ह्याप्रमाणेंच मुतखडा, मूळव्याध, शूळ खोकला, आदिकरून नानाप्रकारचे रोग आपापली बढाई सांगूं लागले. असा प्रकार चालला तों पुढें वाद्यें वाजताहेत, बरोबर, दाहापांच नायका आहेत, मागें कांहीं तमासगीर मंडळी आहे, अशा समारंभानें तिकडून कैफ आला. तो सर्वांस धमकावून ह्मणतो, हः व्हारे सर्व एकीकडे! तुमचें एथें कांहीं काम नाहीं. प्रधानकीचा अधिकार मलाच योग्य. महाराज माझ्या प्रमाणें सरकारची कामगिरी, हे मिळाले आहेत ह्यांतून कोणास व्हावयाची नाहीं. माझ्या बळावर हे सारे काम करणार, आणि ह्या सर्वांचीं कामें मी एकटा करणारा, माझ्यासारखा पराक्रमी प्रधान सरकारास दुर्मिळ आहे; तर ही जागा मलाच द्यावी. असें कैफाचें बोलणें ऐकून मृत्यूनें मान डोलविली. तो

ह्मणाला, गोष्ट खरी आहे; तूं तसाच आहेस; माझी प्रधानकी तुलाच योग्य. असें ह्मणून त्याचाहात धरून मृत्यूनें त्याला आपल्या उजव्या हाताकडे बसविलें, आणि प्रधानकीच्या अधिकाराचीं वस्त्रें त्यास दिलीं.

### तात्पर्य.

नानाप्रकारचे रोग उत्पन्न करणारे, व शेवटीं मनुष्याचा जीव घेणारे कैफासारखें द्वाड साधन दुसरें नाहीं.

---

## गोष्ट ७१.

### मेंढक्याचा वेष धरणारा लांडगा.

कोणी एका लांडग्याच्या घराजवळ मेंढ्यांचा एक कळप होता. त्यांतील मेंढ्या नेण्याच्या किती एक खेपा लांडग्यानें केल्यावर कळपाचे मेंढके आणि कुतरे सावध झाले. तेव्हां लांडग्यास समजलें कीं, आतां आपला लाग साधणार नाहीं, तर ह्याला दुसरी कांहीं युक्ति काढली पाहिजे; नाहीं तर आपला चारितार्थ बुडेल. असें मनांत आणून, लांडग्याने मेंढक्याचा वेष धरला. मागल्या दोन पायांवर उभा राहून, पुढल्या दोन पायांत काठी धरून, तो कळपाकडे हळूहळू चालला. त्या वेळेस मेंढके व कुतरे झोंप लागून घोरत पडले होते, ह्मणून तो लांडगा मुकाट्यानें जर जाता, तर त्याचा लाग खचीत साधता; परंतु आपला मेंढकेपणा खरा करावा, ह्मणून तो त्याच्यास्वराचें अनुकरण करावयास लागला; तेव्हां त्यानें जो कर्कश शब्द काढला तेणें करून मेंढके व कुतरे उभयतां सावध झाले, आणि त्यावर धांवले. लांडग्याने वेष घेतला होता, ह्यामुळें त्याला पळतां येईना; तेव्हां सहजच कुतऱ्यांनीं त्यास धरून ठार मारून टाकलें.

## तात्पर्य.

जे मिष करतात ते बहुतकरून त्यांची संपादणी अधिक करावयास लागतात; तेणेकरून त्यांचा खोटेपणा बाहेर पडून माणसें सावध होतात. असें नसतें, तर मिषखोरांच्या मिषानें लोक फार फसते.

---

## गोष्ट ७२.

## म्हातारा आणि त्याचे लेंक.

एका म्हाताऱ्यास पांच लेंक होते, ते आपआपणांत नित्य भांडत; म्हणून त्याने त्यांस धमकी देऊन पाहिलें, सामोपचारांनेही पुष्कळ सांगितलें, परंतु तें सर्व व्यर्थ गेलें. तेव्हां शेवटीं त्याने ही युक्ती केली. त्या लेंकांस आपल्या समोर बोलावून त्याने काठ्यांची एक जुडी आणविली, आणि प्रत्येकास सांगितलें कीं, तुझ्यांत जितकी शक्ति असेल तितकी करून ही जुडी मला मोडून दे. मग एकेकाने मोठा नेट केला; परंतु जुडींतील काठ्या एकमेकांच्या आश्रयाने होत्या, त्या कोणाच्याने मोडवल्या नाहींत. नंतर म्हाताऱ्याने तीच जुडी मोकळी करून तींतील एक एक काठी एकेकाचे हातीं दिली; आणि पूर्ववत् मोडावयास सांगितलें; मग त्या अवघ्या काठ्या त्यांनीं एका क्षणांत मोडून टाकिल्या. तेव्हां बाप त्यांस म्हणाला, मुलांनो, पाहिलेंना हें एकीचें सामर्थ्य ! तुम्ही असेच मैत्रीने एकमेकांचा आश्रय करून राहाल तर तुम्हास उपद्रव करण्याविषयीं कोणाचीही शक्ति चालणार नाहीं. तोच मैत्रीचा आश्रय एकवेळ सुटला म्हणजे मग भलती एकादी रांड क्षण न लागतां तुम्हास मारील.

## तात्पर्य.

निरंतर आपलें बरें व्हावें असें मनांत आहे, तर मनुष्यांनी परस्पर एकी आणि मैत्री ह्या दृढ राखाव्या, ज्या राज्यांत, अथवा कुटुंबांत, जितकी एकी उणी, आणि फळ्या अधिक, तितकें तें राज्य, आणि कुटुंब, विशेष शक्तिहीन, व शत्रूस सुसाध्य, असें होतें. ह्मटलें आहे; जे आपआपणांत भांडतात, ते आपल्या लयाचें कारण आपण होतात. ह्याजकरितां, राज्यांत, जातींत, मंडळींत, कुटुंबांत, अथवा जेथें जेथें चौघे एक होऊन एकादें काम आरंभितात, त्यांत कलह शिरला, ह्मणजे जाणावें कीं, विनाशकाळ जवळ आला. जे एका आईबापांच्या पोटीं जन्मले, त्यांस तर एकमताने वागणें, व एकमेकांचें हित करणें हें साहजिक असावें; कोणी सांगितल्यावर करावें असें नाहीं. दुःखास वांटेकरी असले ह्मणजे दुःख हलकें जातें, आणि सुखास असले तर सुख दुणावतें.

---

## गोष्ट ७३.

## रानडुकर आणि गाढव.

एका गाढवच्या पोराची आणि रान डुकराची अरण्यांत अवचित गांठ पडली, त्यासमयीं तें गाढव थट्टेने त्यास ह्मणतें रामराम हो, भाऊ, रामराम ! हें सलगीचें भाषण ऐकून डुकरास आश्चर्य वाटलें, आणि क्रोधाच्या आवेशाने त्याच्या मनांत आलें कीं, आतां ह्याचीं आंतडीं बाहेर काढावीं; इतक्यांत त्यास विवेक झाला, आणि तो गाढवास ह्मणतो, रे, हलक्या प्राण्या, तूं आपल्या मार्गाने जा; मी गाढवाच्या रक्ताने आपली दाढ विटाळीत नाहीं: नाहीं तर तुझा जीव घ्यावयास मला क्षणही न लागता.

## तात्पर्य.

मूर्ख आहेत ते आपणास शहाणे समजून थोरांशीं थट्टा करावयास जातात, तर त्यांपासून ते आपला जीव घेऊन परत आले म्हणजे त्यांनीं फार मिळविलें ह्मणून समजावें. मूर्खांनीं मूर्खांशीं लागावें, चाकराने चाकराशीं, आणि हलक्याने हलक्याशीं; हें जाणून राग न आणितां थोर आहेत ते लहान मनुष्यांचे एक दोन अपराध सोसून घेतात, ह्मणून लहान मनुष्यांनीं निर्लज्ज होऊन वारंवार त्यांशीं तसा प्रसंग आणावयास लागूं नये.

---

## गोष्ट ७४.

## लांडगा आणि करडूं.

कोणाएकासमयीं उन्हाळ्याच्या तापाने एका करडास फार तहान लागली; तें एका ओढ्यावर पाणी प्यावयास गेलें; तेथें वरल्याकडेस लांडगा पाणी पीत होता, त्यास पाहून तें खालच्याकडेस पाणी पिऊं लागलें. तें लांडग्याच्या दृष्टीस पडतांच, त्याच्या मनांत आलें कीं, कांहीं निमित्ताने कळ करून आपण यास मारून खावें. मग तो त्या करडास ह्मणतो, रे, हें पाणी त्वां गढूळ केलें; आतां मी आपली तहान कशीरे भागवूं? तर, असें करावयास तुला काय कारण? तें लौकर सांग; नाहीं तर प्राणास मुकशील. करडूं बिचारें घाबरलें, आणि नमून बोलूं लागलें, लांडगे दादा, तूं ह्मणतोस हें होईल तरी कसें? तुझ्याकडून वाहत येतें तें पाणी मी पितों; असें असतां म्या गढूळ केलेलें पाणी तुझ्याकडे उलटें कसें चढेल? लांडगा ह्मणाला, तें असो; परंतु तूं लुच्चा आहेस; तूं आज सहाम-

हिन्यांवर, माझ्या मागें, मला शिव्या देत होतेंस, अ[illegible]त माझ्या कानीं आलें आहे, हें ऐकून करडूं ह्मणालें, रे! रे! अशी गोष्ट कशी होईल ? रे ! ज्या मला जन्मून अजून ती[illegible] महिने झाले नाहींत, त्या म्यां सहा महिन्यांमागें तुला शिव्या दिल्या हें कसें होईल ! लांडगा तेथेंही कुंठित झाला. मग क्रोधाचा मोठा आवेश आणून, डोळे वटारून, हातपाय आपटी[illegible] करडाजवळ आला आणि दांत खाऊन ह्मणाला, रांडलेक[illegible], शिव्या त्वां जर नसल्या दिल्या, तर तुझ्या बापाने दिल्या असतील; एकून एकच. असें ह्मणून त्याने त्या अनाथाचा प्रा[illegible]ण घेतला.

## तात्पर्य.

जो बलवान् आणि घातकी आहे, त्यापुढें आपल्या खरेपणाच्या भर[illegible]शावर दुर्बळाने राहूं नये; कारण कीं, अपराध नसतां तो बळच अपराध लावितो.

---

## गोष्ट ७५.

## लांडगा आणि कोंकरूं.

मेंढ्यांचा कळप एके कुरणांत चरत असतां, त्याचे कुतरे स्वस्थ निजून घोरत होते, आणि त्यांचा मेंढक्या कांहीं दूर एके झाडाखालीं पांवा वाजवीत बसला होता. इतक्यांत एक कोंवळ्या बुद्धीचें कोंकरूं कुंपणांतून बाहेर पाहूं लागलें, तों भुकेने रोड झालेला एक लांडगा आंत डोकावतो आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां कोंकरूं त्यास ह्मणालें दादा, तुह्मी काय पहतां ? एथें तुह्मास काय पाहिजे ? लांडगा उत्तर करितो, लाडक्या, मी हिरवाचारा पाहतों. हिरवाचारा खाणें, व ओहळांतलें स्फटिकासारिखें स्वच्छ पाणी पिणें,

ह्यासारखें दुसरें सुख नाहीं. हें सुख तुह्मी ह्या कुंपणाचे आंत यथेष्ट भोगितां. काय तुमचें दैव चांगलें आहे! तसा हिरवाचारा आणि तसें स्वच्छ पाणी जर मला मिळतें, तर मला दुसऱ्या कशाची आशा नसती. मला फार दिवसांपासून समजलें आहे कीं, अल्प. संतोषी असावें. हें लांडग्याचें कपटी भाषण ऐकून, तें खरें मानून, कोंकरूं ह्मणतें, तर काय, लोक तुह्मांवर खोटी आळ घालतात कीं, लांडगे मेंढ्या मारून खातात ह्मणून! तुह्मीनर हिरवाचारा आणि पाणी इतक्यानेच तृप्त आहां नव्हे! तर आजपासून तुह्मी आह्मी भाऊपणाने वागून एकेठिकाणीं चरूं या. असें ह्मणून तें भोळें कोंकरूं त्या लांडग्याचा स्नेह करण्यासाठीं त्या कुंपणांतून बाहेर गेलें. तें आपल्या कोंवळ्या बुद्धीमुळें व भोळसरपणामुळें लांडग्याच्या हातीं सांपडून तत्काळ प्राणास मुकलें.

### तात्पर्य.

जीं मुलें वयाने लहान व बुद्धीने कोंवळीं आहेत, त्यांनी आपल्या बुद्धीने वागूं नये. जें करणें तें आपले वडील, किंवा कोणी वाकबगार आहेत, त्यांच्या मताने करावें, ह्मणजे त्यांस संकट पडणार नाहीं.

---

## गोष्ट ७६.

### लांडगा आणि घरांत राहिलेलें करडूं.

एक बकरी बाहेर चरावयास जाऊं लागली; त्यासमयीं तिने आपल्या करडास सांगितलें, अरे, आंतून कवाडास खीळ घाल; नी मी संध्याकाळीं परत येईपर्यंत दुसऱ्या कोणास उघडूं नको. तेथें जवळच एक लांडगा होता; तो तें ऐकून, बकरी निघून गेल्यावर

कांहीं वेळ जाऊं देऊन, कवाड वाजवूं लागला; आणि त्याच्या आईसारिखा शब्द काढून, मुला, दाराची खीळ काढ ह्मणून बोलला. करडाने आईची आज्ञा लक्षांत आणून खिडकींतून पाहिलें, तों कपट दृष्टीस पडलें. तेव्हां तें लांडग्यास ह्मणतें, अरे, तूं आपल्या मार्गानें जा; तूं बकरीच्या शब्दासारिखा शब्द काढतोस खरा, परंतु तुझा आकार लांडग्याचा दिसतो, ह्मणून मी तुझा दार उघडीत नाहीं.

## तात्पर्य.

जीं मुलं आईबापांची आज्ञा लक्षांत ठेवितात, आणि त्यांच्या सांगितल्याप्रमाणें चालतात, तीं संकटांत पडत नाहींत. वडिलांच्या सांगण्यावर विश्वास धरावा, ह्यास मोठं कारण हेंच, की तीं आपल्या मुलांचें वाईट कदापि इच्छीत नसतात. कां? जें मुलांचें वाईट तें त्यांचेंच वाईट. दुसरें असें की तीं वयाने वडील ह्मणून त्यांस मुलांपेक्षां बरें वाईट अधिक समजतें. अशीं जीं आईबापें, त्यांचें जीं मुलें ऐकत नाहींत, त्यां मुलांचें कल्याण कदापि होत नाहीं.

---

## गोष्ट ७७.

## लांडगे आणि मेंढे.

कोणेकाळीं लांडग्यांची आणि मेंढ्यांची फार दिवस लढाई चालली होती; त्यासमयीं कुतऱ्यांच्या बळावर मेंढे लांडग्यांस हारीं गेले नाहींत; शेवटीं ह्यांच्या त्यांच्या तहाविषयीं बोलणें होऊन असें ठरलें, कीं परस्परांनीं परस्परांस ओलीं द्यावा. लांडगे मेंढ्यांस ह्मणाले कीं, आह्मी आपलीं पोरें तुमच्या स्वाधीन करितों; आणि

तुह्मी आपलीं कुतरीं आमच्या स्वाधीन करा. तें मेंढ्यांनीं मान्य करून तसें केलें. मग लांडग्यांचीं पोरें मेंढयांकडे येतांच त्यांनीं आपल्या आयांकरितां एकच कुई केली; ती होतांच लांडगे धांवून आले, आणि मेंढ्यांस ह्मणाले, दुष्टहो! तुह्मी आमच्या पोरांस मारून तह मोडिला, तर आतां तुमची आमची लढाई; असें बोलून ते मेंढ्यांवर तुटून पडले; त्यासमयीं कुतरीं जवळ नाहींत ह्मणून ते सहजच प्राणास मुकले.

## तात्पर्य.

शत्रूशीं तहकरितां फार सावधगिरी राखावी. ज्या वस्तु आपल्या भरवशाच्या, ज्यांवांचून आपण निर्बळ त्या वस्तु ओलीसाठीं शत्रूच्या हातीं आपण देऊंनयेत; दिल्या असतां मग त्यास भांडणाचीं निमित्तें काढायास अडचण पडत नाहीं.

---

## गोष्ट ७८.

## लांडा कोल्हा.

एक कोल्हा लोखंडाच्या सांपळ्यांत शेंपूट अडकून सांपडला असतां, तो तें तोडून पळाला, आणि मनांत हर्ष मानितो कीं, प्राणावर आलें होतें तें शेपटावरच गेलें. मग तो आपल्या मंडळींत जाऊं लागला. त्यासमयीं त्यास लांडपणाचा मोठा खेद होऊन तो मनांत ह्मणतो कीं, मी मेलों असतों तर बरें होतें; परंतु ही अपेष्टा फार वाईट. असो, जें झालें त्यास उपाय नाहीं; तर आतां हेंच साजरें कसें करावें? अशा योजना करीत असतां त्यास ही युक्ति सुचली, कीं आपण सर्व कोल्हे मंडळीस एकत्र करावें, आणि सां·

गावें की, म्या आपली शेपटी तोडून टाकून ही भूषणाची नवी त-न्हा काढिली आहे; ही चांगली प्रतिष्ठित आहे, ह्मणून तुह्मां सर्वांस घ्यावयास योग्य आहे. असें योजून तो कोल्हे मंडळीस मिळवून तीं-पुढें नव्या परीविषयीं मोठें वाक्पांडित्य करूं लागला. तो ह्मणतो, अहो! ह्या शेपटीपासून कांहींच हित नाहीं; ह्यांत ही कोल्ह्याची शेपटी ह्मणजे केवळ ओझेंच; ह्यासाठीं शेपटीवांचून असल्यानें ए-कतर भूषण, दुसरें, पळणें, सवरणें झाल्यास उतावळीने करितां येतें. मी असें हें पहिल्यानें आपल्या मनांत आणिलें, मग आपल्या आंगीं अनुभवून पाहिलें तों खरेंच. शेपूट तोडून टाकिलें तेव्हांपासून मी फार सुखी आहें; असें सुख मी आजन्मांत पावलों नव्हतों. असें बोलून तो सर्वांच्या तोंडाकडे पाहूं लागला, कीं, माझे चेले ह्यांत किती होतात? इतक्यांत त्यांतील एक ह्मातारा कोल्हा चोरकर्मांत फार निपूण होता, तो त्याची ती ठकविद्या समजून मान वांकडी करून, उत्तर करितो, पंडित बावा, आतां पांडित्य पुरे करावें. आ-पणास शेपटी टाकून हित झालें असेलच, ह्यांत संशय नाहीं; आ-णि तसा प्रसंग आह्मांवर जा दिवशीं पडेल त्या दिवशीं आह्मी टाकूं.

**तात्पर्य.**

सर्व लोक जर कोल्ह्यांसारिखे सावध असते तर उगीच कोणी कोणाची काढलेली तऱ्हा घेते ना. बहुतेक तऱ्हा जा वस्त्रप्रावरण अलंकार, इत्यादिकांत, अथवा खाण्यापिण्याच्या प्रकारांत आढळ-तात, त्यांचीं वास्तविक कारणें पाहूं गेलें असतां, मनुष्यानीं मीपणा मिळवावयाकरितां, किंवा आपणांत एकादी खोड आहे ती छपवाव-याकरितां. त्या काढिल्या असतात.

## गोष्ट ७९.

### लावी पक्षीण आणि तिचीं पिलें.

एक लावीपक्षीण शेतांत घरटें करून राहात होती. तें शेत पिकलें तेव्हां तीस काळजी पडली. ती मनांत ह्मणाली, माझीं पिलें पांख फुटून चांगलीं उडायास लागायाच्या अगोदर जर शेतकरी शेत कापायास आला, तर कसें होईल ? मग ती नित्य बाहेर चारा आणावयास जाई, त्यावेळीं पिलांस सांगे कीं, माझे मागें कोणी काय बोलेल तितकें सर्व मी घरीं आल्यें ह्मणजे मला सांगा. एके दिवशीं शेताचा धनी शेतावर येऊन आपल्या मुलास ह्मणतो, मुला, मला वाटतें कीं, हें शेत आतां कापायास आलें; त्यास तूं उद्यां सकाळीं जा, आणि आपले इष्ट मित्र व शेजारी ह्यांची शेतकापणीस हात लावावयाविषयीं प्रार्थना कर. असें तो शेतकरी मुलास बोलला, तें पिलांनीं आई घरीं येतांच तीस सांगितलें; आणि तिच्या भोंवतीं किलकिल करून ह्मणूं लागलीं, आई, आतां तूं आह्मास लवकर एथून दुसऱ्या ठिकाणीं ने. आई ह्मणाली, मुलांनो, स्वस्थ असा; कांतर शेताच्या धन्यानें शेत कापण्याविषयीं तीचा भरवसा शेजारी आणि इष्टमित्र ह्यांवर धरिला आहे; ह्यावरून मी पक्कें जाणत्यें कीं, उद्यां कापणी होणार नाहीं. दुसऱ्या दिवशीं लावी बाहेर जाऊं लागली त्यासमयीं तिने पिलांस पूर्ववत् सांगून ठेविलें; त्यावरून तीं शेताचा धनी काय बोलतो तें ऐकावयास टपत बसलीं होतीं. तो शेतावर येऊन बोलाविलेले होते त्यांची वाट पाहात बसला; परंतु कोणी आले नाहींत, आणि ऊनही झालें; तेव्हां तो लेंकास ह्मणतो, अरे इष्टमित्र शेजारी ह्यांवर विश्वास ठेवणें

कांहीं कामाचें नव्हे; तर तूं आतां असें कर कीं, आपल्या सोय-र्‍यांस प्रार्थून त्यांस सांग कीं, मजकारितां तुह्मी सकाळीं अगत्य येऊन कापणीस मदत करावी. तें ऐकून पिलें फार भ्यालीं, आणि आई येतांच त्यांनीं तें वर्तमान तीस सांगितलें. तेव्हां ती ह्मणाली, मुलांनो, इतकेंच जर आहे तर भिऊं नका; कांकीं सोयरीं सोयऱ्यांची तिडीक धरून त्यांच्या कामीं पडतील हें मिथ्या; परंतु उद्यां फिरून तो काय बोलेल तें चित्त देऊन ऐका, आणि मला सांगा. दुसऱ्या दिवशीं शेताचा धनी येऊन फारवेळ सोयरे येणार ह्मणून वाट पाहात बसला, परंतु ते आले नाहींत; तेव्हां तो मुलांस ह्मणतो, कांहीं चिंता नाहीं, मुला, तूं उद्यां सकाळीं दोन खरळ्या चांगल्या पाजवून ठेव; आपणच आपली कापणी करूं. हें वर्तमान पिलांनीं लावीस सांगतांच ती ह्मणाली मुलांनो आतां एथें राहून आपला परिणाम नाहीं, कांकीं जो मनुष्य आपलें काम आपण स्वतां करावयास निघाला, तो बहुतकरून तें शेवटास नेईल. मग तिने आपलीं पिलें तेथून तत्क्षणीं काढून दुसऱ्या ठिकाणीं नेलीं. दुसऱ्या दिवशीं शेतकरी आणि त्याचा मुलगा दोघे येऊन त्यांनीं शेताची कापणी केली.

## तात्पर्य.

जें काम आपणास स्वतां करतां येतें, त्याविषयींचा भरवसा सोयरीं अथवा इष्टमित्र ह्यांवर धरूंनये. जो पुरुष त्यांचा भरवसा धरितो, त्याचे दोन तोटे होतात; एक, मूर्खासारिखें त्यांची वाट पाहात कुथंबत राहाणें; दुसरा, त्यांनीं फसविलें ह्मणून मोठा संताप पावणें. ह्याकरितां जो आपल्या कामाचा भरवासा मुख्यत्वेंकरून

आपणावर ठेवितो; त्याचें काम घडून येतें; आणि कदाचित् फस लें तर त्याला आपल्या मनाचें समाधान करितां येतें की, त्यां आपल्याकडून उद्योग करण्यांत आळस केला नाहीं, काम फसल्याचा शब्द मजकडे काय !

---

## गोष्ट ८०.

## विहिरींत पडलेला कोल्हा.

एके दिवशीं एक कोल्हा विहिरीवर पाणी प्यावयास गेला होता तो आंत पडला; इतक्यामध्यें तेथें एक लांडगा आला; त्यास त्याने विनविलें; दादा, मी बुडतों आहें, मला काढ. एकादा दोर, अथवा दुसरी कांहीं तशी वस्तु, आणून आंत टाकून दे, जेणेंकरून मी वरती येईन. ती कोल्ह्याची दशा पाहून लांडग्यास दया आली. आणि तो त्यास ह्मणतो रे, बापुड्या, मी तुजकरितां फार श्रमी आहें, तुजवर हें संकट कसेंरे आलें ! हाय हाय ! गोष्ट मोठी वाईट झाली. त्यास कोल्हा उत्तर करितो, अरे, बोलतोस तसें तुझ्या अंतःकरणीं जर वसत आहे, तर आतां मजकरितां उगाच श्रमी होत उभा ठाकूं नको; मला बाहेर काढावयाचा उद्योग लवकर कर. अरे जो गटगळ्या खातो आहे, आणि कांहींक पळांनीं बुडून मरणार, त्याची दुसऱ्यास नुसती दया आली, ती त्यास काय उपयोगाची !

### तात्पर्य.

नुसती दया येऊन काय उपयोग ! जर तिजपासून दुसऱ्याचे दुःखाचा परिहार कांहींच होत नाहीं. जे दुसऱ्याचें दुःख पाहून

उगेच कष्टी होऊं लागतात, ते दुःखिताचे मनांत दुःख दुप्पट मात्र करितात; तर जो आपल्या जड अवघड वेळेस कामास पडतो, हाय हाय करून उगाच कष्टी होत नाहीं, त्यास च आपलें दुःख वाणलें खरें; तोच आपला खरा सखा आणि हित कर्ता, ह्मणून समजावें.

## गोष्ट ८१.

## वेषधारी लांडगा.

एक लांडगा मेंढ्याचें कातडें पांघरून त्यांच्या कळपांत शिरला, त्याने आपणास मेंढा ह्मणवून पुष्कळ मेंढे नाहींसे केले. एके दिवशीं तें कपट मेंढरें राखणाचा लक्षांत आलें; मग त्याने युक्तीने त्या लांडग्याच्या गळ्यास दोरी बांधून त्यास झाडाच्या खांदीस टांगून फांशीं दिलें; तितक्यांत त्या वाटेनें दुसरे मेंढरें राखे जात होते, त्यांतून एकाने त्यास पुशिलें; रे त्वां हें काय केलें! तुला वेडतर लागलें नाहीं! तें ऐकून त्याने लांडग्याच्या आंगावरचें कातडें काढून त्याचा संशय फेडिला. मग त्यांनी त्याच्या करण्याची वानणी केली.

### तात्पर्य.

केवळ बाहेरल्या आचारावरून कोणाच्या स्वरूपाची परीक्षा होत नाहीं. बाहेर भला दिसतो, ह्मणून आंतही तसाच असेल, असें मानल्यास आपण फसूं; ह्यासाठीं, सुज्ञ आहेत ते प्रथम आंतला शोध करितात, मग जो आंत बाहेर सारखा परिक्षेस उतरला नाहीं, तो विश्वास घातकी वेषधारी ह्मणून त्याचा फारच द्वेष करितात.

## गोष्ट ८२.

## शहाणा सिंह.

कोणेका सिंहाने एका सावजास मारिलें, आणि त्यास खाणार

तों, त्या वाटेने एक चोर जात होता, तो पुढें येऊन त्यास ह्मणतो, सिंहा, तुझें माझें अर्धोअर्ध. सिंह बोलला, अरे धट्टा, एथें तुझा कांहीं संबंध नसतां, निलाजरा होऊन भाग मागावयास आला आहेस! तर उगाच आपल्या मार्गानें जा नाहींतर प्राणास मुकशील. मग तो चोर लाजून चालता झाला. इतिक्यांत त्या मार्गानें कोणी एक भलामनुष्य जात होता, तो सिंहास पाहून, भिऊन, ती वाट सोडून पलीकडच्या वाटेने जाऊं लागला; तेव्हां सिंह त्यास आदरानें हाक मारून ह्मणतो, अरे, भिऊं नकोरे, भिऊं नको, तूं भलामनुष्य आहेस, ह्मणून ह्यांतील वांटा तुला योग्य आहे, तर ये आतां, हें सावज आपण दोघे वांटून खाऊं. असें बोलून सिंहाने त्या सावजाचे दोन भाग केले; त्यांतील एक भाग त्या भल्या मनुष्याकरितां ठेविला, आणि दुसरा आपण भक्षून रानांत गेला.

## तात्पर्य.

शहाण्या मनुष्यांस हें योग्य आहे कीं, जो भिडस्त, जो भला; जो गुणी, त्यास जवळ करावें; आणि जे गळां पडून मागणार, गांडवाले, चहाड, बहुभाष, दांडगे अशा मनुष्यांस आश्रय देऊंनये. जो मनुष्य अधिकारावर आहे, त्याने तर गुणी मनुष्यें मेळवायाविषयीं फारच यत्न करीत असावें.

---

## गोष्ट ८३.

## शेतकरी आणि त्याचा कुतरा.

एक शेतकरी मुलास पाळण्यांत निजवून, जवळ कुतऱ्यास बसवून पाव घटकेचें काम होतें ह्मणून शेतास गेला. काम झाल्यावर

तो माघारा येऊन पाहातो, तों मुलाचा पाळणा पालथा पडला आहे, आणि त्यांतील चिरगुटें फाटून रक्तानें भरलीं आहेत; जवळ कुतरा निजला होता त्याजकडे पाहिलें, तों त्याचें तोंड व आंग हीं रक्तानें भरलीं आहेत; असें पाहातांच शेतकऱ्याच्या मनांत भरून आलें कीं, कुतऱ्यानें मूल मारिलें. त्यावेळेस त्याला जो त्वेष आली, त्याच्या झपाट्यासरसें हातांत कुऱ्हाड होती ती कुतऱ्याच्या डोकीवर घालून त्यानें त्याचा प्राण घेतला; नंतर पाळणा उलथा करून पाहतो तों मुलास कांहीं धक्का नाहीं; मूल जिवंत आहे. जवळ एक साप मात्र कुतऱ्यानें तोडल्यामुळें मरून पडलेला दृष्टीस पडला. मग त्यास समजलें कीं, मुलाचे प्राण कुतऱ्यानें राखले. तेव्हां शेतकऱ्यास पश्चात्ताप होऊन तो ह्मणतो, हाय, हाय, म्यां दुष्टानें काय कर्म केलें हें! ज्यानें मुलाचा जीव राखला त्याचा जीव विचार नकरितां व्यर्थ घेतला! हा मजकडून अन्याय झाला.

## तात्पर्य.

क्रोधाचा आवेश येतो तेव्हां लागलेंच एखाद्या कामास प्रवृत्त होऊं नये. त्याची शांति झाल्यावर जें करणें तें विचारपूर्वक करावें; नाहींतर निरपराध्यास अपराधी समजून त्यास इजा द्यावी, व भलतेंच करावें, असें होईल.

---

## गोष्ट ८४.

## साप आणि माणूस.

एक मुलगें कुरणांत खेळत होतें, तेथें त्यास साप चावला; त्याचें विष चढून तें मुलगें तत्काळ मरण पावलें. तें पाहून त्या-

च्या बापास मोठा क्रोध चढला, आणि हातीं शस्त्र घेऊन तो सापामागें लागला. त्यानें तो साप बिळांत जाईजाई तों त्यावर एक घाय केला; त्यानें त्याची शेपटी मात्र तुटली, तेव्हां युक्तीच्या वाटेनें सापास लोभवून मारावें, आणि सूड पुरता उगवावा, असें मनांत आणून, दुसऱ्या दिवशीं, मुलग्याच्या बापानें दूध, साखर आणि मध, अशीं बिळाच्या तोंडीं नेऊन ठेविलीं आणि सापास हाक मारून ह्मणतो, मित्रा, अरे मित्रा, बाहेर ये. जी गोष्ट झाली ती झाली; अतःपर तूं आपल्या मनांत तें कांहीं आणूं नको. आतां तुह्मी आह्मी सख्य करूं. तें ऐकून सापानें आंतूनच उत्तर केलें. बाबा, आतां सख्याविषयीं तूं फुकट श्रम करूं नको; कांकीं जोंपर्यंत तुला मेलेल्या मुलाची आठवण राहील, आणि मला तुटलेल्या शेपटीची, तोंपर्यंत आपणां उभयतांच्या मनांत एकमेकांविषयीं कल्याण वागणार नाहीं.

तात्पर्य.

ज्यानें दुसऱ्यास अपकार केला आहे, तो आपल्या मनांत भीत असतो कीं, हा कधीं तरी सूड उगवील; आणि ज्यास अपकार झाला आहे, तोही त्या अपकारास कधींही विसरत नाहीं; ह्मणून त्या दोघांसीं पुन्हा मैत्री होणें कठीण आहे. आतां येथें हें उचित आहे कीं, शत्रूसही क्षमा करावी; परंतु शत्रूशीं मैत्री करून त्याचा विश्वास धरणें, हें त्यास योग्य नव्हे.

## गोष्ट ८५.

## सांबर आणि पारध.

कोणी एक सांबर आपल्या तारुण्यांत आला असतां इतर

सांबरांस मोठा उपद्रव करूं लागला. त्याने भुईवर पाय मारावे, शिंगें हालवावीं आणि उंचस्वराने ओरडावें, असें कीं, सर्वांनीं भय पावून कांपूं लागावें. एके दिवशीं त्याचें पाडस येऊन त्यास विचारितें, अहो, जे तुह्मी आपण मोठे बळकट, मोठे दुर्जय, असा आव घालितां, ते तुह्मी कुत्र्याचा शब्द ऐकतांच भयाने जीव घेऊन कांहो पळतां ? ह्याचें कारण काय तें मला सांगाल ? सांबर ह्मण तो, बालका, तूं बोललास तें खरें; परंतु तें कसें होतें तें मलाहि समजत नाहीं. मी आपल्या मंडळीमध्यें तेजस्वी, बळकट आहें खरा; आणि मी वारंवार आपल्याकडून आपल्याठायीं निश्चय करितों कीं, अतःपर कोणापासून ही भय पावून मी डगमगणार नाहीं; परंतु काय करूं! कुत्र्याचा शब्द माझ्या कानीं पडलापुरे, ह्मणजे माझी गाळण होत्ये. मग होईल तितकी त्वरा करून मी पळतच सुटतों.

## तात्पर्य.

फांकडे भांडखोर पुरुष, अवसान घातकी असतात. त्यांचा आव त्यांच्या सोबतीच्यांत मात्र तितका पाहावा; शूरांपुढें त्यांच्याने टिकाव धरवत नाहीं. पाहाण्यांत असें आलें आहे कीं, ज्यांच्या मुखांत रात्रंदिवस शिपाईगिरीच्याच गोष्टी असतात, अशा पुरुषाकडे एकाद्या वीराने डोळे वटारून पाहिलें पुरे, ह्मणजे त्याचा हिरमोड झाला. मग असलें खोटें अवसान घालणाऱ्याचा पाणउतारा पाहाण्याचा चमत्कार आहे. अशा वेळेस तो भय, लाज, आणि रोष, ह्या तिहींच्या गोंधळांत पडतो. तो जर धैर्य धरून थोडेसें शौर्य करील, तर आपली शोभा राखील; परंतु त्याचा उपाय ना-

हीं; प्रसंग आला ह्मणजे त्याचें अवसानच जातें. त्यासाठीं खोटें आडंबर कोणी कितीही घालो, ज्याचा जो सहज स्वभाव तो शेवटीं प्रकट होईलच.

---

## गोष्ट ८६.

### सांबरीण जी पाण्यांत पाहात होती.

कोणी एक सांबरीण नदीवर पाणी पीत होती; ती पाण्यांत प्रतिबिंबलेलें आपलें रूप पाहून फार समाधान पावली; मग पायांपासून मस्तकापर्यंत निरनिराळे आपले अवयव न्याहाळून ह्मणत्ये, आहाहा! माझ्या मस्तकावरील शिंगांची सांगड काय सुंदर आहे! कीं जिने माझें तोंड शोभिवंत केलें आहे! माझे विशाळ नेत्र कमळास लाजवितात! माझें आंग मऊ फुलासारखें! असेंच जर माझे हे पाय सुंदर असते, तर मी कोणास गणित्येंना; परंतु काय करूं; ह्यांनीं मला लाज आणिली; हे बारीक; त्यापेक्षां अगदींच नसते तरी बरें होतें. अशी ती खंती करीत आहे, तंव पाठीवर पारधी आले; त्यांची चाऊल समजतांच ती तेथून पळाली; तिच्या मागें तेही लगट करीत गेले. तेव्हां ती, त्यांच्या हातून लवकर निघून जावें ह्मणून आडवाटेने जाऊं लागली; तों झाडींत शींगें गुंतून अडकून पडली, तें पाहून, पाठीवर ते होतेच त्यानीं तीस धरीलें. त्यासमयीं ती मनांत ह्मणाली, रे, रे, जे पाय मला वाईट वाटत होते त्यांनीं तर संकटांतून माझी निभावणी केली, परंतु जा शिंगांचा मी गर्व वाहत होत्यें, तींच मला नाशास कारण झालीं.

### तात्पर्य.

आपण सर्व अवयवांनीं सुंदर नाहीं, ह्मणून स्त्रियांनीं खेद क-

रूनये. खोडकर अवयव आहे तो जसा समयीं, त्यांचें पातिव्रत्य रक्षणाविषयीं उपयोगी पडतो, तसा सुंदर अवयव पडत नाहीं. पातिव्रत्य हें स्त्रियांचा प्राण आहे, तें नसतां त्या प्रेतवत् जाणाव्या.

---

## गोष्ट ८७.

## सायाचा वृक्ष आणि कांटे झाड.

एक उंच सरळ सायाचा वृक्ष अरण्याच्या मध्यभागीं वाढला होता; तो नित्य आपल्या थोरीच्या गर्वानें आपल्या खालीं रुजलेल्या झाडांस धिक्कारीत असे. त्या झाडांमध्यें एक कांटेझाड होतें, त्यास ते न साहून, त्यानें त्या सायास एके दिवशीं विचारिलें, बाबा, तूं एवढा गर्व कां वाहतोस, तें सांग. तो ह्मणाला, मी सर्व वृक्षांमध्यें श्रेष्ट आणि शोभिवंत आहें; माझा माथा मेघ मंडळास भेदून गेला आहे; माझ्या खांद्या सतत हिरव्या टवटवीत राहतात; आणि तुह्मी अशीं आहां कीं, बहुत नीच; जो आला त्यानें तुह्मांस पायांखालीं तुडवून जावें; माझ्या पानांवरून ज्या पाण्याच्या ठिपक्यांच्या धारा पडतात त्यांनींच तुह्मी बुडून जातां, कांटे झाड ह्मणालें, तें सर्व असो; पण मी तुला सांगतों तें खरें मान, कीं, जासमयीं लांकूड तोड्या तुझ्या बुंधावर कुऱ्हाडीचा घाव घालावयास येईल, त्यासमयीं आह्मांमधील जें एकादें केवळ निकृष्ट हलकें झाड, त्याशींपण तूं मोठ्या संतोषानें आपल्या मोठाईची अदलाबदल करावयास इच्छिशील

### तात्पर्य.

थोरामागें अनेक उपाधि असतात, तितक्या लहानास नसतात ह्याकरितां थोर आणि लहान ह्यांच्या सुखदुःखांचा विचार केला

असतां, थोरपणाच चांगला असें ह्मणावयास अवघड पडेल. अशी गोष्ट एसतां, पदवीनें किंवा संततीनें जे थोर झाले त्यांनी गर्व करून लहानाचा तिरस्कार करावा, हा केवढा मूर्खपणा!

---

## गोष्ट ८८.

### सिंह, आस्वल, वानर, आणि कोल्हा.

सर्व पशूंचा राजा जो सिंह, त्यानें एकेसमयीं जाहीरनामा लावून आपली सर्व प्रजा हुजुरांत बोलाविली. मग प्रजामंडळी जमली तींत आस्वल होता; तो धीटपणाने पुढें गेला आणि हुंगावा घेऊन सिंहराजाच्या खोलीची वाईट घाण येते असें दाखवून, त्यानें आपलें नाक दाबून धरलें. ही आस्वलाची आमर्यादा सिंहास न आवडून त्यानें त्याचा जीव घेतला. मग वानरानें, ती आस्वलाची दशा पाहून, राजाच्या खोलीची स्तुति केली; तो ह्मणाला, महाराज, आहाहा, काय सुगंध ह्या खोलीचा सांगावा! गुलाब, अत्तर, अरगजा, कस्तूरी, ह्यांचा घमघमाट ह्या खोलींतून येत आहे! आणि महाराजांचे पाय किती सुंदर! आस्वलास मारण्यासाठींच केले आहेत जसे. हा वानराचा लुब्रेपणा त्याच्या नाशास कारण झाला; कांतर अशी आस्वलाची अमर्यादा वाईट वाटली, तशी वानराची खुशामतही वाईट वाटून सिंहानें त्यासही पायानें दाबून मारून टाकिलें, मग सिंह कोल्ह्यास ह्मणतो, कां कोल्होबा. तुला कसा वास येतो! कोल्ह्यानें उत्तर केलें, महाराज, माझ्या नाकाचा तिखटपणा सांगावयाजोगा नाहीं, त्यांत सांप्रत मला पडसें झालें आहे, ह्मणून मला वास कांहींच समजत नाहीं.

## तात्पर्य.

थोरांची निंदा करणें, हें आपल्या नाशास कारण होतें. आणि नसत्या गुणाची उगीच प्रशंसा करणें, हें आपल्या योग्यतेस वाईट; ह्मणून खरा भाव तो सांगतां नये असा प्रसंग आला असतां मौन धरून उगेंच राहावें, हें बरें.

---

## गोष्ट ८९.

## सिंह आणि उंदीर.

एक सिंह, उष्णकाळींच्या दिवशीं, अरण्यामध्यें एका आंब्याच्या शीतळ छायेस सुस्त निजला होता; तेथें त्यास उंदरांनीं फार उपद्रव मांडिला, तेणेकरून तो जागा होऊन त्याने पंजांत एक उंदीर धरिला. त्यास फाडून टाकणार तों, त्याने सिंहाची प्रार्थना केली, महाराज ! आपण थोर, सर्व श्वापदांचे राजे, मी आपल्या पुढें केवळ रंक, माझ्या रक्ताने आपले हात विटाळूं नयेत। मला जीवदान द्यावें हेंच स्वामीस उचित आहे. तें ऐकून सिंहास दया आली, आणि त्याने त्यास सोडून दिलें. पुढें एके दिवशीं, तोच सिंह अरण्यांत फिरत असतां, त्याच आंब्याजवळ पारध्याने जाळें मांडिलें होतें त्यांत सांपडला. त्यासमयीं त्याने आपलें बळ होतें तितकें वेंचलें, परंतु सुटका होईना; तेव्हां निराश होऊन मोठ्याने आरोळी मारली; ती ऐकतांच तो उंदीर त्याजवळ धावून आला. आणि ह्मणतो, राजा ! भिउंनको, स्वस्थ ऐस. असें ह्मणून त्या उंदरानें आपल्या दातांनीं जाळ्याच्या गांठी कुरतुडून सिंहास मोकळें केलें.

## तात्पर्य.

मोठे आहेत त्यांनेंही, समयीं, लहानाच्या हातून महत्कार्य होतें; ह्यासाठीं जे आपल्या सत्तेखालीं आहेत, त्यांवर आपण आवडीनें कृपाच करीत असावें. एकादे वेळेस लहानाच्या हातूनही उपकार होतात, वैभव सारखेंच चालत नाहीं; अशी गोष्ट जर आहे, तर मग आपण सर्व लोकांशीं बऱ्या भावाने कां चालूं नये ? आपल्या चालत्या काळांत आपण जर लोकांवर उपकार करून ठेविले, तर लोकही आपल्या पडत्या काळांत उपयोगीं पडतील. सर्व न पडले तरी त्यांतून कोणी एकादा कृतज्ञ निघेलच कीं, ज्या एकाच्या साहित्याने आपलीं सर्व संकटें दूर होतील.

---

## गोष्ट ९०.

## सिंह आणि पशु.

एकेसमयीं सिंह आणि कित्येक पशु ह्यांचा करार झाला कीं, आपण एका मतें विचाराने पारध करावी; व जें मिळेल तें सारिखें वांटून घ्यावें. एकेदिवशीं सिंह, कोल्हा, लांडगा आणि तरस ह्या चौघांनीं मिळून एक हरिण मारिला. कोल्ह्याने त्याचे चार वांटे केले; तेव्हां सिंह पुढें होऊन, त्यांतील एके वांट्याकडे बोट करून, त्यांस ह्मणतो, रे, ऐकतां ? हा वांटा माझा कर ह्मणून मी घेतों; हा दुसरा तर मींच घ्यावा, कांकीं, तुह्मी जो पराक्रम केला तो सगळा माझ्या बळावर; मग तिसऱ्या वांट्याकडे पाहून तो डोकें हालवून ह्मणतो, हा वांटा मी ह्यासाठीं घेणार कीं, ज्या अर्थीं तुह्मी माझी प्रजा आणि मी तुमचा राजा, त्या अर्थीं तुह्मी मला भक्तीने

घालच. आतां हा शेवटचा वांटा, तुह्मी जाणतां कीं, सांप्रत आपला काळ अडचणीचा आहे; सेनेकरितां आपल्या जवळ भक्षायाची सामग्री पुष्कळ नाहीं; ह्मणून मला जतन करून ठेवणें प्राप्त आहे; कांकीं पुढें अडचण पडेल तों तिची सोय आज करून ठेवावी. अशी नीति आहे. कां ! मी ह्मणतों हें तुमच्या विचारास येतेंना ! नाहीं ह्मणाल, तर त्यांत माझें कांहीं जात नाहीं; तुमचाच नाश होईल, हें लक्षांत आणा. हें सिंहाचें भाषण तिघे ऐकत होते. त्यांस सिंहाच्या क्रोधमुद्रेचें इतकें भय वाटलें, आणि त्याच्या पंजाचा इतका धाक पडला कीं, त्यांच्याने कांहीं बोलवेनासें झालें; मग निमूटपणीं निघून जाऊन, पुढें पारध करणें ती आपल्या बरोबरीच्याशीं करावी असा निश्चय त्यांनीं केला.

### तात्पर्य.

दुर्बळ आणि बळवान् ह्यांची एकी फार दिवस नीट निभत नाहीं. बळवान् आहेत ते मुळीं एक होतेवेळीं आणभाष करितात; परंतु संधी फावली असतां करार मोडावयास त्यांस उशीर लागत नाहीं; ह्मणून त्यांशीं योग करणें हेंच आधीं मूर्खत्व होय. एकवेळ त्यांच्या कच्छपीं लागून फसल्यावर, मग, आह्मांस त्यांनीं असें ठकावें कायहो ! ह्मणून दुसऱ्यापाशीं गाऱ्हाणें सांगणें, हें तर अत्यंत मूर्खत्व होय.

---

## गोष्ट ९१.

### सिंह आणि बकरा.

एका सिंहाने एक बकरा डोंगराच्या कड्यावर चरतां पाहि-

ला. तेव्हां तेथें आपली गति नाहीं. असें जाणून तो त्यास ह्मणतो, रे, तूं, अशा अवघड ठिकाणीं आवघा दिवस चरतोस. ह्यांत तुला काय सुख आहे ? टेणें मारितां मारितां एकाद्यावेळेस पडलास तर प्राणास मात्र मुकशील. मला हें बरें दिसतें कीं, त्वां खालीं यावें, आणि ह्या मैदानांत कोंवळें कोंवळें गवत आणि झाडांचीं मधुर मधुर पाने आहेत हीं खावीं. बोकड उत्तर करितो, बाबा, तूं ह्मणतोस ती गोष्ट खरी; परंतु तूं मला बुभुक्षित दिसत आहेस, ह्मणून तूं आहेस त्या ठिकाणीं येऊन आपला जीव संकटांत घालीत नाहीं.

तात्पर्य.

जे पुरुष बुभुक्षित, ज्यांस बोलण्यांत प्रमाणिकपणा नाहीं, अशांनीं कांहीं आपल्या हिताची गोष्ट सांगितली ती खरीशी वाटली, तरी तिजवर विश्वास ठेवूं नये; कारण तिच्यांत कांहीं कपट आहे असें जाणावें.

---

## गोष्ट ९२.

### सिंह आणि बेडूक.

एक सिंह सरोवरावर पाणी प्यावयास गेला होता, तेथें बेडकाची डरोंकणी ऐकून दचकला, आणि चोहोंकडे पाहून मनांत ह्मणतो, रे, एथें तर कोणी दृष्टीस पडत नाहीं, आणि शब्द तर राहून राहून होतो; हें काय असेल; ह्मणून भयानें कांपूं लागला, परंतु तेथून पळून नजातां, धैर्य धरून विचार करितो आहे, इतक्यांत सरोवरांतून डरोंडरों करीत तोच बेडूक बाहेर निघाला; त्यास पाहतांच सिंहास क्रोध आला कीं हा लहान जीव असून त्याने मजसारिख्यास इतकें व्याकूळ केलें! मग तसाच त्या बेडकापाशीं गेला, आणि त्यास पायानें चेंगरून टाकिता झाला.

### तात्पर्य.

भयाचीं कारणें बहुतकरून खोटीं असतात; तीं जे अविवेकी, जे मूर्ख त्यांसच उपद्रव करितात; जो विवेकी, धैर्यवान् आहे, तो त्याचें मूळ शोधीत जातो; तेव्हां त्याच्या लक्षांत येतें कीं, आपल्या मनावांचून भयासदुसरें मूळ नाहीं.

---

## गोष्ट ९३.

## सिंह आणि चार बैल.

चार बैल मैत्री करून एकाठायीं चरत असत, व एकमेकांस विसंबत नसत. एक सिंह त्यांस नित्य पाहून मनांत ह्मणे कीं, ह्यांतून एकादा खावयास मिळता तर बरें होतें. तो सिंह एकएकास मारावयास समर्थ होता; परंतु चौघांची एक जूट पाहून त्यांजवर उडी घालावयास त्यास धैर्य होईना; तेव्हां कित्येक दिवसपर्यंत दूर राहून टेहळीत होता, पण कांहीं लाग साधेना; शेवटीं त्याची खातरी झाली कीं, जोंपर्यंत हे एकांत आहेत, तोंपर्यंत माझें चालणार नाहीं. तर आतां एकमेकाच्या चाहाड्या एकमेकांस सांगून ह्यांत फूट पाडावी. मग तो तसें करितांच ते बैल आपआपणांत द्वेषकरूं लागले, आणि शेवटीं वेगळे पडले; नंतर एकाएका बैलास मारावयास सिंहास कांहींच श्रम पडला नाहीं.

### तात्पर्य.

एकचित्त आहेत तोंपर्यंत त्यांवर शत्रूचें चालत नाहीं; एकीचें इतकें माहात्म्य आहे; ह्मणून ती एकी चुगल्या ऐकून, अथवा शत्रूच्या गोष्टींस चित्त देऊन, तोडून टाकितां दूरवर विचार करावा.

---

## गोष्ट ९४.

### सिंहाचें सोंग घेणारा गाढव.

एका गाढवास सिंहाचें कातडें सांपडलें, तें त्यानें आंगावर घे-तलें. मग तो अरण्यांत किंवा चरावयाच्या जागीं गेला असतां, भयानें सर्व श्वापदांनीं त्यास पाहून पळत असावें. एकासमयीं त्या-च्या धन्याची गांठ पडली; त्यासही तो भिववूं लागला. तेव्हां त्याचे लांबकान पाहून धन्यास ओळख पटली कीं, हातर आमचा गाढव आहे. मग त्यानें हातीं एक सोटा घेऊन गाढवास चांगली शिक्षा केली, आणि त्यास सांगितलें कीं, त्वां सिंहाचें कातडें पांघरलें आहे, तरी मी बरें जाणतों कीं, तूं गाढव आहेस.

### तात्पर्य.

जो कोणी, आंगीं योग्यता नसतां, शूरपणाच्या जाणतेपणाचा अथवा संतपणाचा आव घालितो, तो दुर्बळ, अज्ञान जनांस ठकवि-तो; परंतु जाणत्याशीं गांठ पडली असतां ते त्याचें स्वरूप ओळखू-न उपहास करितात.

---

## गोष्ट ९५.

### सिंहीण आणि कोल्ही.

एके दिवशीं एक सिंहीण आणि कोल्ही ह्या उभयतांची गां-ठ पडली, त्यासमयीं श्वापदांमध्यें कोणत्या जातीस अधिक वीण अ-सत्ये ह्यावर गोष्ट निघाली. त्या प्रसंगीं कोल्ही सिंहिणीस ह्मणाली कीं, विणीविषयीं तर कोल्ह्याच्या जातीची बरोबरी कोण करणार? ती बोलली कीं, आह्मी वर्षांतून अधिक नाहीं तरी एकवेळ वितोंच;

आणि दरखेपेस अनेक पिलीं होतात. परंतु किती एक जाती अशा आहेत कीं, दर खेपेस एक पिलूं वितात; आणि तेंही कदाचित् सगळ्या जन्मांत एकवेळ, असें असतांही त्यांस गर्व किती! त्या तितक्यावरच नाक वर करून दुसऱ्या कोणास गणीत नाहींत. सिंहीण मनांत समजली कीं, कोल्हि मजा लावून बोलिली, मग ती तीस ह्मणत्ये, अगे ऐकत्येस? तुह्मी अधिक पिलीं प्रसवतां, हें पाहातार्थीं वास्तवीक आहे; पण तीं कोण? कोल्हीं, आणि आह्मी एकच प्रसवतों; परंतु मनांत आण कीं त्या बालकास सर्व श्वापदांचा राजा असें ह्मणतात.

### तात्पर्य.

जें कांहीं आपणापासून होतें, त्याचें मोल त्याच्या संख्येवर करूं लागूं नये; जातीवर करावें. आपण थोडकेच उद्योग केले, परंतु ते जर असे आहेत कीं सांप्रतच्या लोकांस, व पुढें होणाऱ्या लोकांसही, जांपासून मोठा उपयोग होणार, तर ते प्रशंसेस योग्य होत. नाहीं तर पुष्कळ कोल्ह्या कुतऱ्यांची वीण होऊन देशास उपद्रव मात्र जसा तसे ते होत. दुसरें ह्या गोष्टीचें तात्पर्य कित्येक कवी आहेत ते अनेक ग्रंथ करण्यांत पुरुषार्थ मानितात, तो त्यांनीं मानूं नये. शंभर वावगे ग्रंथ करून लोकांस वाचावयाचा श्रम द्यावा, त्यापेक्षां एकच पण सर्व मान्य असा केल्यांत पुरुषार्थ विशेष आहे.

---

## गोष्ट ९६.

### हरिण आणि द्राक्षी.

एका हरिणामागें पारधी लागले, तेव्हां तो पळत पळत एक

द्राक्षी आड झाला. तो दृष्टीस पडेना, तेव्हां पारधी निराश होऊन मागें फिरले, तों त्या वेलीचींच पानें तो खाऊं लागला, तेणेकरून तीं हालूं लागलीं; इतक्यांत त्या पारध्यांतून एकानें मागें पाहिलें; आणि त्यास वाटलें कीं, कोणी सावज वेलींत आड झालें आहे; ह्मणून त्यानें अटकळीनें एक बाण टाकिला, तो हरिणास लागून त्याचा प्राण गेला. मरतेसमयीं तो आपणाशीं ह्मणतो. रे कृतघ्नास मला हें पारिपत्य योग्य झालें! माझ्या संकट समयीं मला कामास आली त्या वेलीसच म्या कसा उपद्रव करावा!

### तात्पर्य.

कृतघ्नपणा हा सर्व दोषांचा राजा आहे. जो आपल्या हितकर्त्यास उपद्रव करितो, तो पुरुष इतर जनास उपद्रव करण्याविषयीं मागें पुढें कशास पाहील! ह्यासाठीं कृतघ्न झाला ह्मणजे त्याचा दुष्टपणाचा कळस झाला.

---

## गोष्ट ९७.

### हरिण आणि सिंह.

एका हरिणाच्या पाठीस पारध्यांचे कुतरे लागले; तो भयानें जीव घेऊन पळाला, तो एका गुहेंत शिरला; तेथें सिंह होता त्यानें त्याजवर झांप घातली, आणि त्यास तत्क्षणीं पाडाव केलें. तो हरिण मरतेवेळेस आपणाशीं ह्मणतो, रे! रे! काय मी हीन भाग्याचा! मी मनुष्यांच्या आणि कुतऱ्यांच्या हातून सुटावें ह्मणून ह्या गुहेंत आलों, तों सर्व सावजांमध्यें जो क्रूर त्याच्या हातीं सांपडलों.

### तात्पर्य.

जे भयाने घाबरतात, आणि तें टाळावयाकारितां दुसऱ्या निर्भय जागीं जावयाचा उद्योग करितात,ते अधिक विपत्तींत पडतात. जे थोर आहेत ते एक पातकाचेंभय मात्र बाळगितात; एरवीं ह्या सर्व विश्वाचे तुकडे तुकडे झाले,किंवा आकाश कोसळून पडलें,तरी त्यांचें चित्त डगमगत नाहीं.

---

## गोष्ट ९८.

### हर्क्युलीस आणि गाडेकरी.

एक आडाणी गाडेकरी गाडा हांकून नेत होता, तो एकाठायीं चाकें चिखलांत रुतून आडकला; असा कीं बाहेर काढावयास बैलांचा उपाय चालेना. तें पाहून गाडेकरी ह्याने हर्क्युलिसाचा धांवा आरंभिला, हे देवा! मी दीन आहें; ह्यासाठीं मला तूं सहाय हो; तें कानीं पडतांच हर्क्युलिसाने पाहिलें तों गाडेकरी उगाच बसून करुणा भाकितो आहे. तेव्हां तो त्यास ह्मणतो रे, मूर्खा, तूं आळशासारिखा स्वस्थ बसून राहूंनको. ऊठ आणि बैलांस चांगल्या काठ्या मार; चाकांस आपल्या खांद्याचा नेटावा दे;ह्मणजे मी तुला सहाय होईन. तुला माझें साहित्य असावें, तर असा उद्योग कर. मग गाडेकरी तसें करतांच गाडा चिखलांतून बाहेर निघाला.

### तात्पर्य.

उद्योग करून जो देवाकडे साहित्य मागतो, त्यासच तें प्राप्त होतें निरुद्योग्यास प्राप्त होत नाहीं.

---

*हर्क्युलिस हा प्राचीन ग्रीक व रोमनलोकांनीं मानलेला देव होता.

## गोष्ट ९९.

## हंस आणि बगळे.

एका शेतांत हंस आणि बगळे नित्य उपद्रव करीत असत. एके दिवशीं शेताचा धनी, जपणोस लागून चाकरांसहवर्तमान अकस्मात् त्यांजवर तुटून पडला; त्यासमयीं आंगाने पुष्ट आणि जड ह्मणून बहुतेक हंस सांपडले, आणि बगळे सडक आंगाचे ते लवकर उडून गेले.

### तात्पर्य.

शत्रु मागें लागला असतां, निर्धना पेक्षां धनिक फार दुःख पावतो. सेनेचें खटलें जसें तळावर मात्र सुखदायक, एरवीं ओझें. तसें द्रव्य स्वस्थपणांत मात्र सुखदायक; संकटसमयीं तें संभाळून नेणें फार कठिण आहे.